# प्रास्ताविक

ईश्वरी कृपेच्या आणि विषण्ण विवंचनेच्या या वर्षी मला "स्टफर्ड लिट्ल व्याख्यानें" देण्याचें निमंत्रण आल्यामुळें, मी कांहीं थोडा थोडका प्रभावित झालों नाहीं. कारण तो माझा अत्यंत मोठा सन्मान होता.

कांहीं थोडीं वर्षे मी इतिहासज्ञ होतो. आतां माझें विद्वत्तेचें तें उपकरण रात्रीनें गंजून गेलेलें आहे; परंतु मी माझी मतें अजूनहि तशींच सुस्पष्ट राखलेली आहेत. आपल्या मनावर प्रचलित मतें आणि लोकप्रिय गैरसमज यानीं जर आपला जबरदस्त पगडा स्वत बसविला नसेल तर, त्याच्याविषयीं ऐतिहासिक ज्ञान आणि ऐतिहासिक अनुभव याच्या–आणि अशा अनुभवानीं कसोटी घेतलेल्या सत्याच्या प्रकाशात निर्णय घेणें, आपणास भाग आहे. कल्पकतेनें कांहीं काळ अन्य युगात संचारणें, हाच वर्तमान कालीन समस्याचें मूल्य मापन करण्याचा अत्युत्तम मार्ग होय. या अशा कामाच्या रेटारेटीत आणि अशात धावपळीत, मानवी मन आणि चैतन्य यानीं निर्मिलेल्या थोर सृष्टीशी असलेली ओळख पुन्हा वाढविणें सुद्धा चांगलें आहे. मनुष्याच्या स्वतःच्या अंतर्यामी असलेल्या कर्तृत्वशक्तीच्या संचयाची योग्यता त्याला समजता येण्याजोगें स्थान त्या सृष्टीच्यामध्यें संचारासाठीं असतें.

या व्याख्यान मालेतलीं ऑलिव्हर सेंट जॉन गोगार्टीची, किंवा "समंजस वृत्ति" वरलीं लिन युतांगची व्याख्यानें ऐकणें मला प्रिय वाटलें असतें. तिशाच्या मध्य कालातील कांहीं वर्षे खरोखरच समंजसपणाचीं असलीं पाहिजेत. कारण त्याच कालखंडात तुम्हाला मास्कोच्या एका प्राध्यापकाचीं भाषणें सुद्धां ऐकायला मिळू शकलीं! त्याच कालात विल्यम बीबे यानीं जें एक व्याख्यान दिलें व त्याचें शीर्षक तर, प्रसंग विशेषीं जेव्हा मी एखाद्या आतर्राष्ट्रीय प्रश्नाशी झगडत असतो, तेव्हा मला वाटणाऱ्या जाणीवेचें द्योतक असल्याचें, मग स्मरण करून देणारें वाटलें. तें असें होतें,–"चारशें फॅदम खालीं!"

या व्याख्यान मालामधून, पधरा वीस वर्षापूर्वी, आमच्या समस्याचे सातत्य आणि आमच्या चित्तचक्षूच्या दूर दृष्टि बद्दल आस्था दर्शविणाऱ्या— "अरब राष्ट्रवादाचा विस्तार," "दूर पूर्वेतल संकटाचा प्रसंग," "विज्ञानाच्या सामाजिक गुंतागुती", "कॅाँग्रेस आणि परराष्ट्रीय धोरण",

अशा सारख्या विषयांवर येथें चर्चा करण्यात आलेल्या होत्या. त्या सर्वांमधूनच प्रचलित समस्यांचा सूर निघतो. १९३५ मध्यें "राष्ट्रांच्या समाजांतर्गत शांततामय परिवर्तन" या विषयावर श्री. जॉन फॉस्टर डल्लेस यांचे मुद्दां एक व्याख्यान झालें होतें; तें मला नक्कीच वाचून काढलें पाहिजे!

मला स्वतः "जागतिक राजकारण आणि लोकशाही" या-( भरपूर अवसर देणाऱ्या व त्या हेतूनें देण्यात आलेल्या, ) विषयावर बोलावयाचें आहे. स्वर्गीय श्री. हेन्री स्टिम्सन आणि अन्य आठ स्टॅफर्ड लिट्ल व्याख्याते यांनीं नुकत्याच कांहीं वर्षांत लोकशाहीच्या विविध स्वरूपाचें विवेचन केल्याचें मला समजल्यामुळें, माझी उत्सुकता नेहमींपेक्षां अधिक वाढली होती. त्या विषयाचें प्रासंगिक किंवा गुंतागुंतीचें स्वरूप कधींहि संपुष्टात येणार नाहीं. तरीपण आतां लोकशाहीचा उल्लेख करतांना कुणीहि बहुधा बिचकतो. हुकूमशहांनी तिच्या अर्थाची प्रतारणा करून, केवळ शब्द म्हणून-तिच्यावर वर्चस्व गाजवायला प्रारंभ केलेल्या दिवसापासून, तिचें रणशिंग जीर्ण झिजून गेलेलें आहे. ते जेव्हां तिच्या आधीं 'जनतेची' असें विशेषण लावतात, तेव्हां त्या दुःखावर फक्त आणखी एक डागणी मात्र देण्यांत येत असतें.

तथापि लोकशाहीची व्याख्या करतां येईल. तिच्या खऱ्या अर्थाचा स्पर्श आम्हाला जरी व्यक्त करतां येत नसला, तरी मुद्दां तो आमच्या अंतरात खोलवर जाणवतो. सामाजिक आणि राजकीय प्रगतिसाठीं ती कितीहि भली असली, तरी प्रामाणिक व बुद्धिमान व्यक्तिगत निर्णय आणि कृती यांच्यामुळेंच केवळ तिला शक्तिशालिनी आणि निरोगी राखतां येणें शक्य असतें. आपण राहतो त्या जगातल्या आमच्यावर दाब आणणाऱ्या आवाजांच्या गोंगाटात-( त्या गोंगाटाला गैर समजामुळें बहुधा लोकशाही मानण्यात येतें )-आज आपल्याला तसें करणें सोपें नाहीं. परंतु सोपें असो वा नसो,-आपल्याला लोकशाही केवळ लष्करी व आर्थिक बळानेंच नव्हें तर बौद्धिक व नैतिक सामर्थ्यानिशी मुद्दां बलिष्ठ करायची आहे.

ओटावा, ७ मे १९५५ लिस्टर बी. पियर्सन

# १ : जुन्या समस्या–नवें प्रमाण

उदारमतवादी आणि प्रातिनिधीक लोकशाही, गेल्या पन्नास वर्षांच्या अवधींत, स्वत गंभीर, आणि कधीं कधीं तर आसन्नमरण संकटात सापडलेली आहे सर विन्स्टन चर्चिल यानीं ज्याला " विकाळ विसावें शतक " म्हटलेलें आहे, त्याच्या प्रथमार्धात संघर्षांच्या ज्या बिकट आव्हानाना आपण आधींच तोंड दिलेलें आहे, त्याच्या प्रमाणेंच सामना द्यायला बिकट अशीं आव्हानें आपल्यापुढें आता आडवीं आलेलीं आहेत, असें मानायला सबळ कारण आहे.

तथापि यातील बहुतेक आव्हानें, तीं स्वत ला ज्या दैत्याकार नव्या प्रमाणात हजर करीत आहेत, त्याच्या मुळेंच तीं मुख्यत. ओळखता येतात निव्वळ तीं आव्हानें म्हणजे आता "ढोबळपणानें लिहिलेल्या" त्याच जुन्या पुराण्या समस्या असतात

आपल्या काळातील समस्याचा विस्तारावरून आपणास त्याचे स्वरूप जेरीस येण्याजोगें वाटलें, तरी त्या तशा असतीलच असें मात्र नव्हे संगीत किंवा अन्य कला, गणित किंवा वास्तुशास्त्र याच्या समान अन्य विविध क्षेत्राप्रमाणेंच, जागतिक राजकारणात केवळ त्याचें स्वत चें प्रमाण, सामान्यत दुय्यम महत्त्वाचें असतें मूलभूत गोष्टींचा संबंध काहींसा प्रमाणाचीं मूल्यें अथवा अंश याच्याशीं असतो स्वय परिमाण सापेक्ष असतें आकाराच्या विस्ताराचे नवे अवयव नेहमीं, आमच्यावर अवघड परंतु परिचीत हक्क सांगणाऱ्या मूळ तत्त्वात भग्न होत असल्याचें परीक्षेअती सिद्ध होत असतें म्हणूनच कधीं कधीं परिमाणवाचक परिवर्तन, काहीं तरी सर्वस्वीं नवें दिसणारें निर्माण करण्याइतकें मोठें वाटलें, तरी सुद्धा केवळ आकारामुळें आम्हीं स्वत ला हतबुद्ध करून घेणें, हें मूर्खपणाचें असतें

आमच्या राजकीय समस्यांचें प्रमाण जरी विस्तारलें असलें, आणि लावण्यात आलेल्या पणांचा उच्चांक जरी मानवकुलाचें अस्तित्व त्याच्यामुळें धोक्यात येण्याइतका वर चढला असला, तरी त्या समस्यांचें आवश्यक लक्षण काहीं नवें नाहीं. त्याना तोंड देणें सांत्वनकारक असतें कीं नसते,

हा प्रश्न जरी वादग्रस्त असला तरी, मानवांनी त्यांना आधी तोंड दिलेलेंच आहे. त्यांनीं अनेकदा असे संकल्प यशस्वी केले असले तरी पण त्यांना प्रसंगीं पराभूत देखील व्हावें लागलें. तथापि, आतां पराभवाचें किंवा गंभीर प्रमादाचें शासन पूर्वी कधीं नव्हतें त्यापेक्षां अधिक मोठ्या प्रमाणात मिळत आहे. अत.पर मानव जातीला अधिक प्रमाद करणें परवडूं शकणार नाहीं.

आजचीं आमचीं बरीचशीं विघ्नें आणि संकटें म्हणजे गतकालीन अपयशाच्या परिणामाचा भरीव हिस्सा होत. वदतो व्याघात असा, कीं आमचीं इतर विघ्नें आणि संकटें हीं बऱ्याच मोठ्या अंशात आमच्या यशाचा—विशेषेकरून सुष्टिज्ञान आणि तंत्रकला विज्ञान यांच्या क्षेत्रातील आमच्या यशाचा परिणाम होत

समाजाच्या—तद्वतच व्यक्तींच्या जीवनाचें एक विशेष लक्षण असतें. समस्याशीं झोंबी घेऊन त्या आटोक्यात आणण्यांत यश मिळालें कीं, परिणामीं अधिक विकट समस्यांना सामना देण्याची संधि आणि त्यांच्यावर प्रभुत्व ठेवण्याचें बंधन पदरीं पडत असतें. सतत वर जाणारी चढण आपण नित्यकाल-पर्यंत चढत असतों.

आपण वर चढण्यात आणि आपलें उद्दिष्ट गाठण्यात बहुतेक यशस्वी होऊं; मात्र त्याच्यासाठीं आपल्याला गतकालातल्या अनुभवाचें स्वरूप व त्याचा आशय यांच्याबद्दलची कांहीं सूत्रें, आणि कांहीं खात्री पटविणारे निकष हस्तगत करतां आले पाहिजेत. आपल्याला आपल्या मार्गांत अवश्यमेव येणाऱ्या विघ्न प्रसंगाचें मापन करण्यास आणि ज्याच्यावर आपली बरीच मदार राहील, असे अचूक निर्णय घेण्यास, त्याची बरीच मदत होऊं शकेल.

पाश्चात्य संस्कृतीच्या संबंध इतिहासामधून असे दोन केंद्रीभूत निकष चालत आले, असें मला सुचवायचें आहे.

पहिला म्हणजे, आकांक्षा आणि कृती यांचें केंद्र या नात्यानें 'व्यक्तिगत मानव' होय. सुमारें २४०० वर्षांपूर्वी प्रोतागोरस या ग्रीक तत्ववेत्त्यानें आपल्या एका सुभाषिताव हाच आशय व्यक्त करताना म्हटलेलें आहे,— "सर्व वस्तुजाताचा मापनदंड म्हणजे मानव होय." या वाक्यीत अधिक

मूलभूत प्रश्न उपस्थित करण्यासारखा आहे, परंतु प्राप्त परिस्थितींत प्रोतागोरसचें हें विधान सत्य असून, त्याची योग्यता इतिहासाची एक थोर बधविमोचक अंतर्दृष्टि आणि प्रेरणा या नात्यानें सिद्ध झालेली आहे. ग्रीक विचार आणि कला यांचीं बरीचशीं महत्कृत्यें याच मताचे स्मारक स्तंभ होत. आणखी अधिक जवळच्या काळात झालेल्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या मानवतावादी चळवळी आणि कायदेमंडळनिष्ठ लोकशाहीचा विकास यांची गणना त्याच विचाराच्या मूलभूत अंतर्दृष्टीच्या गुंतागुंती सोडविणारे प्रबंध म्हणून करावी लागेल.

आमच्या संस्कृतीचें केंद्र बनलेला दुसरा निकष-" मानवाचें मापन कोणतें ? " अशा निष्कर्षकारक परंतु अधिक वेधक प्रश्नाचा उहापोह करीत असतो. यामुळे दुसऱ्या एका अशा प्रश्नाला मान्यता मिळते कीं, जरी मानव खरोखरच इतर वस्तुजाताचा मापनदंड असला, तरी त्याच्यासाठींसुद्धा एक माप असतेंच, आणि त्या मापानेंच व्यक्तिगत मानवी प्राण्याची कसोटी घेण्यात येत असते. आपल्याला तें माप, पूर्णतः मानवी असूनसुद्धा एकाच वेळीं विश्वव्यापी आणि परिपूर्ण असलेल्या मूल्यात म्हणजे संक्षेपतः नैतिकता व आध्यात्मिकता यांच्यात सापडत असतें.

आमच्या संस्कृतीला आकार आणून देणाऱ्या मनुष्याच्या आकांक्षा आणि मूल्यें यांच्यात, अर्थातच, आत्यंतिक विभिन्नता आढळून आलेली आहे. परंतु तीं सर्व या द्विविध मनुष्याच्या कोणत्या एका तरी स्वप्नरंजनापासून मिळालेल्या स्फूर्तीच्या सूत्रात एकत्र ओवलेलीं आहेत.

*हे निकर्ष जरी देण्यात येणाऱ्या आव्हानाशी* व्यवहार करताना, स्वभावतः स्वयंमतीनें कोणताहि साधा बलप्रयोगाचा ' अंगुष्ट दर्शन न्याय ' वापरीत नसले तरी, मला असें सुचवायचें आहे कीं, ते त्या आव्हानाचा प्रतिकार करताना आपल्याला यशस्वी प्रतिकार करावयाचा आपल्याला मदत करीत असतात आणि असल्यास, त्याच्यासाठीं कराव्या लागणाऱ्या प्रयत्नासाठीं एक उद्दिष्ट उभें करतात.

शेजारधर्म आणि मित्रता वर्धिष्णु होण्यास उत्तेजन मिळावें म्हणून, शेजाऱ्यांच्या गरजांचें समाधान करण्याच्या दृष्टीनें वागणें, असेंच धोरण नित्यकाल सदिच्छा प्रेरित मनुष्यांनीं ठेवलेलें आहे. आणि आंतर्राष्ट्रीय राजकारणात दीर्घ-

कालीन उद्दिष्टाच्या दृष्टीनें आमच्या समस्यांचें स्वरूप असलेला हा हेतु, क्षेत्राच्या नसला, तरी स्वभावधर्मांच्या बाबतीत, नवीन नाही.

अर्थातच सगळींच माणसें कांहीं या उद्दिष्टाच्या पाठीं लागत नसतात. सगळीं माणसें कधींच लागलीं नव्हतीं. अजीहि माणसें असतात कीं ज्यांना सहकार्या ऐवजीं संघर्ष, शांतते ऐवजीं सत्ता अधिक पसंत पडते. कित्येकांच्या मतें हें असें नेहमींच चालत राहील, आणि राजकारण तथा समाज कधीहि कोण-त्याहि अन्य धारणेवर आधारता येणें शक्य होणार नाहीं. तथापि या बाबतींत मोझा पक्ष देवदूताचा आहे. माझी तर अशी श्रद्धा आहे कीं, जगात पूर्वीं कधीं नव्हतें इतकें प्रमाण—नव्हे त्याहून अधिक—आज सत्प्रवृत्त लोकांचें आहे, आणि आमच्या युगातल्या डोळे दिपविणाऱ्या तांत्रिक आणि वैज्ञानिक विकासामुळें त्यांच्या संख्येत घट होण्याच्या ऐवजीं अधिक भर पडत आहे.

एरिक फ्रॉम्म आपल्या "स्वातंत्र्याचें भय" या पुस्तकांत सदहू आशावादी दृष्टिकोण खालील शब्दात व्यक्त करीत आहे :

"इतकें क्रौर्य आणि विध्वंसाची वृत्ति इतिहासाच्या पुराव्यावरून का दिसून येते, याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. जर कशामुळें आश्चर्य चकित आणि प्रोत्साहित व्हायचेंच असेल, तर तें पुढील वस्तुस्थिती-मुळें व्हायला पाहिजे, असें मला वाटतें. इतकें सगळें मनुष्यांना भोगावें लागलें, तरी मनुष्य जातीनें गौरव, हिंमत, सभ्यता आणि ममता यांच्या-सारखे सद्गुण नुसते जोपासलेच नाहींत, तर प्रत्यक्षपणें त्यांचा विकास देतील केला, असें आपल्याला समग्र इतिहासात आणि आजहि अगणित व्यक्तिमात्रात आढळून येईल."

माणसें आणि कल्पना आणि वस्तू, यांची वाहतूक ज्या अंतरावर सत्वरतेनें आणि त्वरेनें करणें शक्य असतें, त्या अंतराच्या अनस्थेवरून नेहमी शेजारीपणाचें मापन करण्यात येते, आमच्या युगाच्या आश्चर्यकारक भौतिक विकासाचा एक परिणाम म्हणजे, निदान कांहीं हेतूंसाठी तरी, शेजारीपणा हा आता एक जागतिक प्रमाणाची वस्तुस्थिति बनलेला आहे प्रमाणातला हा बदल आपल्याला जागतिक राजकारणात जमेला धरावाच लागेल. दुर्दैवानें त्यापल्याला शेजारधर्म आणि मित्रता यांची सखोलता आणि सीमा यांच्या बाबतीत या

पळवाटा नसणाऱ्या वस्तुस्थिती समान असणारी कोणत्याहि प्रमाणातली एखादी तुल्य साधना अजूनहि करून दाखविता आली नाहीं

म्हणूनमनें आपण ही समस्या या खंडापुरती तरी सोडवलेली असून, या साधनेविषयीं आपल्या उभय देशातील लोकाना रास्त अभिमान यावत आहे तथापि, आता संयुक्त अमेरिका आणि कॅनडा यांच्यामधील संबंधाचे सुलक्षण असणारी ही शेजारधर्म व सहकार्य याची कल्पना अधिक विस्तृत असलेल्या दूरच्या आघाडीवर आपण लागू केली पाहिजे त्याबाबतीत काहीशी प्रगति झालेली आहे सामुदायिक कृतीमुळें सुरक्षिततेचा विकास आणि अविकसीत देशाना तांत्रिक सहाय्य व आर्थिक मदत देण्यात झालेली प्रगति, यावरून आपण योग्य दिशेनें वाटचाल आधींच आरंभिली आहे, असें दिसून यतें तथापि आपल्याला आणखी पुढें जावें लागेल आणि हें सुद्धा आपल्याला अधिक बिकट होणार आहे

आपल्या पिढीला मानवी संबंधा संबंधीच्या-म्हणजेच राजकारण विषयक-समस्याना ज्या वरचढ प्रमाणांत तोंड द्यावें लागते, त्याचें दर्शन दोन्हाच क्षनात होत असतें पहिलें म्हणजे मनुष्यांना घोरणाचे साधन म्हणून उपलब्ध झालेलें सत्तेचें परिमाण होय, आणि हीं धोरणें ज्याना ठरवायचीं असतात, त्या राजकीय समाजाचा आकार, हें आणखी दुसरें होय आजकाल महत्वाच्या राजनैतिक समस्या राष्ट्राराष्ट्रा-यामध्यें अतःपर उपस्थित न होता संस्कृतींच्यामध्यें उपस्थित होत आहेत आणि वस्तुत काहीं समस्या तर संपूर्ण मानव जातीला सामान्यत लागू पडणाऱ्या आहेत लोकशाही समाजाच्या अंतर्गत देखील भवितव्याला आकार देणाऱ्या निर्णयाच्या बाबतींत ज्या आवडीनें लक्ष घालतात आणि ज्या त्याच्यावर आपला प्रभाव पाडतात, अशा समस्यांची संख्या इतिहासात पूर्वी कधीहि नव्हती, त्यापेक्षा अतुलनीय प्रमाणात अधिक अवाढव्य आहे

पुढील विचार म्हणजे परिमाणाच्या या नव्या परपरेला लोकशाही व जागतिक राजकारण याच्या संदर्भात काय अभिप्रेत आहे, याची थोडीशी तपासणी करण्याचा एक प्रयत्न मात्र होय

# २ : सामर्थ्यांच्या प्रमाण बद्धता

एका नव्या आणि अवाढव्य प्रमाणांत आपल्या पिढीपुढें स्वयं प्रगटणाऱ्या एका समस्येचा उद्भव सामर्थ्याच्या नव्या वस्तुस्थितींच्या मधून झालेला आहे. अणु विज्ञानानें आता कांहीं माणसें आणि राज्यसत्ता यांच्या हातीं हें विध्वंसक सामर्थ्य दिलेलें आहे, आणि लवकरच आणखी अनेक जणांच्या हातीं जे पडेल, त्याचें प्रमाण कोणत्याहि मागील प्रमाणाच्या मानानें विलक्षण अद्भूत आहे.

राष्ट्रांच्या धोरणाचें साधन म्हणून वापरण्यासाठीं उपलब्ध असलेल्या सामर्थ्यांच्या परिमाणांचा हा वरचढपणा अन्य संबंधीत क्षेत्रांमधील समस्यांच्यावर विशिष्ट निकड लादतो आणि तिच्यावर भोट ठेवतो.

या नव्या शारिरीक सामर्थ्यांच्या शोधामुळें लोकशाही आणि जागतिक राजकारण यांच्यात,–तें सामर्थ्य फक्त मोकाट सोडण्यास शिकलेली माणसें अजून तरी तें आवरण्यास शिकली नाहींत म्हणून,–निर्माण झालेल्या गुंतागुंतीचें आकलन, राज्यसत्ता हातीं असलेल्या किंवा नसलेल्या फारच थोड्या माणसांना होऊं, शकलें असावें, असा मला संशय वाटतो. परंतु मानवतेच्या आणि राजनीतीच्या वर्तनाचे जे विशिष्ट आदर्श आहेत, आणि मानवता शांतिपूर्वक सुखेनैव नांदण्यासाठीं ज्यांची संपादणूक अतःपर स्पृहणीय वाटावी, मानवता नुसती जिवंत राहण्यासाठीं नजीकच्या भविष्य काळांत ज्यांची आवश्यकता प्रतीत होईल, त्यांनी थोडया पटापट कांहीं योग्यता असामान्य अंतर्दृष्टीची गरज असावी लागत नाहीं. आतांपर्यंत माणसांनीं ज्या कांहीं गोष्टी कशलीहि हानि झाल्याविना जरी नाहीं, तरी पण निदान तात्कालिक विनाशक परिणामांच्या विना, टाळतां येणें शक्य झालें, त्या मन्वन्तरी गोष्टी खूपच अधिक गंभीरपणानें अतःपर आपल्याला हातांत घ्याव्या लागतील.

इतिहासाच्या प्रारंभ काळापासून प्रत्येक स्त्री-पुरुष व्यक्तिमात्राला आत्म-हत्येची योग्यता आहे. आपण स्वतःच्या नात्यानें, बहुतेक या योग्यतेकडे दुर्लक्ष करून, निर्धास्तपणें जगण्यानें शिकत आलो.

व्यक्तिगत आणि मानसिक पातळीवर हें नेहमी सत्य होत आलेलें आहे, पण आता प्रथम विश्वव्यापी सामाजिक व राजकीय पातळीवर पुढें

ठरें ठरण्याच्या इतिहासाच्या अवस्थेप्रत आपण येऊन पोहचलों आहोंत. आपलें अस्तित्व टिकविण्यासाठीं या वस्तुस्थितीच्या सघटनात्मक किंवा राजकीय सूचना स्वीकारणें आणि त्या व्यवहारात आणणें, आपणास भाग पडणार आहे असें करताना पहिली पायरी म्हणजे, आपण प्रसगाच्या विस्ताराची स्पष्ट जाणीव करून घेतली पाहिजे, आणि नतर त्या जाणीवेसबधीं, प्रेरणा आणि परिणाम याच्या बाबतींत राष्ट्रीयत्वाच्या पेक्षासुद्धा नेहमीं अधिक उच्च असणाऱ्या धोरणाचा अगीकार करून, कृती केली पाहिजे

मी ज्याना आतर्राष्ट्रीय नीति शास्त्राचे आदेश म्हणू शकेन, त्याच्यात अशी क्रांति घडवून आणण्याचा धाक घालणाऱ्या मूलग्राही तात्रिक वस्तुस्थितीचें आकलन करणें सुद्धा पुरेसें कठिण झालेलें आहे काही थोड्याच वर्षांपूर्वी दहा टन स्फोटक ' टी अेन्टी ' असलेला बॉम्ब त्याच्या आधीं कधींहि न वापरण्यात आलेलें अत्यत भयकर सामर्थ्याचें अस्त्र मानण्यात येत असे, अशी माझी कल्पना आहे हिरोशिमावर टाकण्यात आलेल्या अणुबॉम्ब मध्यें २०,००० टन ' टी अेन्टी ' इतकें स्फोटक सामर्थ्य होतें अन्य शब्दात सागायचें म्हणजे प्रमाणात सहस्र पटीनें वाढ झालेली होती. सध्या उपलब्ध असलेल्या तथा कथित मोठ्या हैड्रोजन अस्त्रानीं तर हे प्रमाण आणखी दुसऱ्या सहस्र पटीनीं वाढविलें असून, आता त्याचें मापन दुसऱ्या विश्वयुद्धात वापरण्यात आलेल्या स्फोटकाच्या एकरेषा दशलक्षपटीनें मोठ्या असलेल्या, दशलक्षटनी एककें करण्यात येत असतें

आज प्रचड दशलक्षटनाचें अस्त्र आणि प्रमाणित अण्वस्त्र याच्यात जितकें महदतर आहे, तितकेंच महदतर स्फोटक अस्त्र आणि आता ज्याला आपण अजाणता व्यग्यानें विकल होऊन दुसऱ्या विश्वयुद्धामधील " प्रचलित " बॉम्ब म्हणतो, त्या स्फोटकामध्यें होतें आता आपण विध्वसाच्या दोन प्रचडाकार पद्धतींशी व्यवहार करीत नसून, तिघीशी करीत आहोंत पण आतातरी याचा शेवट झाला आहे ना ? पस्तीस वर्षांपूर्वी नेक नामदार हर्बट ॲस्क्विथ म्हणाले होतें कीं आता कुठें विज्ञानानें " सर्वनाशाचें अक्षर जोडाक्षरानें घोकायला " प्रारभ केला आहे त्या विज्ञानाच्या बाळाचें आता शेवटचें जोडून झालें असेल का ?

या हैड्रोजन स्फोटकाचे सामर्थ्य समजायाला समान पुरेसें भयावह आहे परतु या सामर्थ्याचें अधिक जास्ती भयकर स्वरूप म्हणजे केवळ एकाच

बॉम्बच्या स्फोटानें हजारों चौरस मैलाचा प्रदेश अणुविषाक्त होऊन दूषित होऊ शकतो.

झंझावात आणि स्थानिक रेडिओ ॲक्टिव्ह वर्षा यांच्यामुळें होणारा विध्वंसक परिणाम बाजूला सारला, तरी जगाच्या पाठीवर कुठेंहि काहीं थोडे शेंकडा हैड्रोजन अस्त्रं किंवा साजेशा कवचांत असलेलीं विकिरणकें यांचा थोडक्या अवधींत स्फोट होणें, काहीं कल्पनेला सोडून नाहीं त्यांच्यामुळें वातावरण दूषित होऊन पृथ्वीवरील कोट्यावधि रहिवासी गंभीर दीर्घ व्याधींचे बलि होऊ शकतील आणि असे काहीं सहस्र स्फोटकें कुठेंहि धापरलीं, तरी त्यामुळें सर्व मानवी जीवनाचे अस्तित्व नष्ट होण्याची भीति उत्पन्न होईल

या विषयावर चर्चा करतांना आपली एका मुद्याचा नेहमीं विसर पडत असतो आपल्या पिढीत अमेरिका, रशिया आणि ब्रिटन यांच्या व्यतिरिक्त आणखी इतर कित्येक देशांच्या जवळ देखील अण्वस्त्र तयार करण्याचें आणि त्यांचा मारा कोणत्याहि लक्ष्यावर करतां येण्याचें सामर्थ्य असण्याचा संभव आहे

अशा भीषण विस्ताराच्या सामर्थ्य विषयक समस्यांमध्यें अंतर्भूत झालेल्या राजकीय आणि सरक्षक गोष्टींच्या द्वारा विचार करण्याचा, आणि या सर्व प्रकाशासंबंधी आपण मान्यता दिलेल्या विविध अनुमानांचा फेरविचार करण्याचा, आपण प्रयत्न करणें आता आवश्यकपणें महत्वाचें बनलेलें आहे.

या फेर विचाराच्यामुळें कित्येकांनीं तर असा सिद्धांत मांडला आहे कीं या अस्त्रांच्या महाभीषण विध्वंसक सामर्थ्यांनीच महायुद्धाची शक्यता कमी केलेली आहे, किंवा तें अशक्य केलेलें आहे. मानवतेचा नाश करण्याच्या ऐवजी ते युद्धांचा नाश करतील. प्रत्येक पक्षाला जर प्रतिपक्षाचा समूळ नाश करण्याची शक्ति असेल, आणि प्रत्येक पक्षाची प्रतिकार शक्ति जर प्रतिकाराची मोहीम सुरू करण्यापूर्वी ,आक्रमकाकडून नष्टभ्रष्ट होण्यापासून पूर्ण सुरक्षित आणि विविध दिशांना पुरेशी विकीर्ण झालेली असेल, तर युद्धाच्या प्रारंभानें परिणाम आगाऊ कळण्यासारखे आहेत ते म्हणजे परस्पर विनाश ! इच्छा शक्तीला होणारा हा पक्षपात जर टाळता आला, आणि तसा टाळण्यास आपल्याला जर समजलें, तर बुद्धिवादी व माहितगार मनुष्याच्या विरुद्ध असें निवारण परिणामकारक ठरूं शकेल हिरव्यागारपणा प्रगाया

माजलेल्या व पिसाळलेल्या मनुष्याला तें रोखू शकणार नाहीं कदाचित, परंतु जो केवळ माजलेला आहे, त्याला मात्र तें निवारण रोखून धरू शकेल सिद्धातांचें विपयसूत्र अशाप्रकारचें आहे

काहीं दिवसापूर्वी असें वृत्त आलें होतें कीं, श्री मॅलेन्कोव्ह यानीं सुद्धा आणखी युद्ध म्हणज जगाच्या संस्कृतीचा विनाश, अशी कबूली आपल्या विविध भाषणातून दिलेली आहे याबद्दल 'प्रावदा'नें त्याना दोषहि दिलेला होता, आणि आतां रशियन प्रचारक ढोंगीपणानें पुन्हा असें सागत आहेत कीं अशा युद्धामुळें फक्त भांडवलशाही कोसळून पडेल आणि साम्यवादी समाज मात्र आपलें अस्तित्व सुरक्षित ठेवू शकेल स्वयं उन्मादाच्या क्रमपद्धतीमुळें, सरतेशेवटीं माणसें स्वत च्याच प्रचारावर पूर्ण विश्वास ठेवतील, असा धोका नेहमींच असतो, परंतु क्रेमलीनमधील रशियन हुकूमशहा इतके अडाणी किंवा अल्प माहिती असणारे असतील, असें मला तरी वाटत नाहीं या हैद्रोजनच्या विश्वात, ते जरी राजकीय बाबतीत आमच्या बाजूचे नसले, तरी शरीरानें आमच्याच जोडीला आहेत, याची आम्हाला जाणीव आहे, आणि दरीतरच बाज्यायानें आमचें "सहजीवन" सुरू आहे त्यानासुद्धा या वस्तुस्थितीची जाणीव असेल अशी आशा आणि श्रद्धा मला वाटत आहे या अशा जाणीवेमुळें सर्व साधारण सदिच्छेच्या पायावर नसली, तरी सर्व साधारण भयाच्या पायावर, एकवाक्यता होण्याची शक्यता निर्माण होईल

चिनी कम्युनिस्ट पुढाऱ्यांच्या बाबतीं आणखी अधिक धोका होण्याचा संभव आहे अजूनहि क्रांतीच्या विजयाच्या धुंदीनें आणि राष्ट्रीयत्वाच्या व साम्यवादाच्या मिष्पा दैविक भ्रांतीनें भारावून गेल्यामुळें, त्याना अण्वस्त्राच्या युद्धाच्या परिणामीं स्वत ला आपलें राष्ट्रीय सामर्थ्य आणि राजकीय संघटना यांचें सातत्य राखता येण्याची हमी मिळण्याइतपत, पुरेसें स्वातंत्र्य मिळवितां येईल, अशी त्यांची समजूत झाली असण्याचा संभव आहे त्यांचें असें मत आहे म्हणतात कीं, चीनसारखा विपुल जनता असलेला आणि इतका अविकसीत, इतका गुंतागुंतीपासून अलिप्त, इतका लवचीक लोकसमाज कोणत्याहि उत्क्रांति पासून सापेक्षत सुरक्षित राहू शकेल अण्वस्त्राच्या ठोशानेंसुद्धा चीनला थोडासा हादरा बसेल परंतु तो कधींहि कोलमडून पडणें शक्य नाहीं एखाद्या

युद्धात जरी त्यांचे दहा कोटी किंवा अधिक लोक दगावले, तरी त्यांचे चाळीस कोटी उरतातच आणि ते आपले अस्तित्व टिकवू शकतात, परंतु पाश्चात्य देश तसें करू शकणार नाहीं

तथापि हैड्रोजन बॉम्ब हा पूर्वीच्या अस्त्राच्या मानानें अत्यंत मोठ्या मर्यादेत सध्या बलाचें समत्व राखण्यात आणि भूगोलाला निष्क्रीय करण्यात अत्यंत निपुण असल्याची दरखल सर विन्स्टन चर्चिल यांच्या सारखीच इतरांनी घेतल्याचें ज्ञान या मुखवटाला जरा आवरून धरू [illegible] हीं अस्त्रें सेनाच्या विरुद्ध वापरण्यापेक्षा सीमाच्या विरुद्ध वापरण्यात येतील, आणि त्याच्यामुळें दयाचीच न हे तर रहाची सुद्धा राखोळी होऊ शकतील त्यातलें एकेक अस्त्र, सहस्त्रावधि चौरस मैलांचा प्रदेश, मग तो कितीहि दाट वस्तीचा किंवा तुरळक वस्तीचा असो, निर्मनुष्य बेचिराख करून सोडूं शकेल भौगोलिक राज्य यात्राला त्यानी नवें वळण दिलें, आणि लष्करी व राजनैतिक डावपेचाच्या एका नव्या पविम्याची आवश्यकता पुढें सारली

या अशा परिस्थितींत, माझ्यामतें, या शीत युद्धांमधील कोणत्याहि पक्षानें विरोधी पक्षाला धमक्या देणें, किंवा आत्मघातीच्या यत्नाना करणें हें अत्यंत मूलपणानें आणि शांतता किंवा सुरक्षितता यांच्या दृष्टीं अपकारक ठरणारें आहे तरवारीचा खणखणाट करण्याइतकेंच हैड्रोजन अणूचा खणखणाट करणें बालिश असलें तरीपण तें अत्यधिक धोक्याचें सुद्धां आहे हैड्रोजन आणि हवादाया याचें मिश्रण अपथ्यकारक असतें त्यातच हीं असली हातीं लागू न शकणारी आमीनें पाडून वर, आजच्या काळांत राजकीय आणि सैनिकी नेत्याना आपलें उसळलें उष्ण रक्त सद्भावानी अवश्य करण्यापूर्वी आवरून धरण्याची, आणि मन पूत कृति किंवा वाचाळपणा करण्यापूर्वी शांतपणें विचार करण्याची आवश्यकता, पूर्वी कधीं नव्हेत इतक्या उत्कटतेने प्रतीत झालेली आहे

कम्युनिस्ट नेते हे, सर्वांप्रमाणें पट व आत्मसंयमी वृत्ति असलेल्या बुद्धि बळाच्या खेळाडूच्या समान, निर्मम हिशोबी आहत असें पश्चिमेतील अनेक लोकाना वाटत असतें सर्वांना नि सगण सने आहत युद्धां। परंतु सतार, विशारदपणा, स्वत विषयी ती सात्त्विक चीड, आणि दीर्घकालीन योजनेच्या दृष्टीने भावनात्मक दृष्ट्या ही सर्व त्यांच्या राजकीय आणि भावनात्मक

सरमानाचा एक भाग देखील असू शकतात. म्हणून या नव्या सामर्थ्यानिशीं हुकूमशाही सुल्मकर्ते विकारवशतेनें जुगाराचे डाव खेळतील, असा धोका आपल्यापुढें नेहमींचा आहे तद्वतच यातना आणि संयम याची पराकोटि गाठणाऱ्या लोकशाही सत्तांच्या संरक्षक-प्रतिबंधक डावपेचामुळें परिणामीं असाच धोका संभवतो त्याना स्वत ला वाटत असलेल्या भयाच्या पोटीं त्याच्या हातून काहींतरी अश्लाघ्य आणि अडाणी गोष्टी घडतील आणि त्याचे परिणाम, त्याच्या मनात तसें करावयाचें नसूनसुद्धा, अमुपकारक होतील.

आणखी मुद्दा एक धोक्याचें मूळ आहे

सध्या दूर पूर्वेत अशीं काहीं सरकारें आहेत कीं त्यांच्या प्रमुखाना आपल्या लढायात इतराना गोंवून घेण्याची आस्था आहे, कारण विशिष्ट राष्ट्रीय धोरणाची सांगता करण्याचा तेवढाच काय तो मार्ग असतो स्वातंत्र्याची आणि कम्युनिस्टानीं हिरावून घेतलेल्या राष्ट्रीय प्रदेशाची पुन्हा प्राप्ति करून घेण्याच्या प्रयत्नाशीं संबंधित असलेलीं त्याचीं अंतिम उद्दिष्टें तशीं चांगलीं असतील आणि त्याच्याविषयीं आपण सहानुभूति देखील दाखवू परंतु त्याच्या प्राप्तीसाठीं सुचविण्यात येणाऱ्या मार्गाविषयीं मात्र आमचे बरेच मतभेद आहेत ही उद्दिष्टें प्राप्त करून घेण्यासाठी नव्यानें पुन्हा लढाया करण्याची आवश्यकता त्याना प्रतीत होते, आणि त्या लढायात विशिष्ट पाश्चात्य राष्ट्रें त्यांच्या पक्षाला असावींत, असें ते नेते गृहीत धरून चालतात आशियातील अशीं संबंधित सरकारें स्वतः जरी आपल्या लोकशाहीच्या आचरणातून किंवा नागरिकांच्या स्वतंत्रते संबंधीच्या त्यांच्या आदरभावातून, काहीं श्लाघ्य गोष्टींना फाटा देत असले, तरी असल्या "स्वातंत्र्य" युद्धाची घोषणा नेहमींच 'लोकशाहीसाठी संग्राम' म्हणून करण्यात येते, कारण कम्युनिस्ट विरोधी कोणतीहि गोष्ट लोकशाहीवाचक असते, असें निःसंदिग्धपणानें गृहीत धरण्यात येत असते या सिद्धान्तान्वये हिटलर सर्वश्रेष्ठ लोकशाहीवादी ठरला असता, पण या निष्कर्षाबद्दल कुणीहि शंकित होईल!

हीं अण्वस्त्र अधिक विस्तृत प्रमाणात राष्ट्रांनीं धारण केल्याचा काळ जेव्हा येईल, तेव्हा तर हा धोका अधिकच वाढेल विशिष्ट प्रदेश किंवा विशिष्ट सामर्थ्यें याच्यावर प्रभावी सार्वभौम सत्ता, किंवा काहीं थोड्याशा अण्वस्त्रावर मुद्दा अल्पकाल परिणामकारक नियंत्रण असणाऱ्या व्यक्तींना अथवा सरकाराना,

मी आताच वर्णन केलेल्या प्रकाराचीं दडपणें जेव्हा असह्य होतात, तेव्हां त्याचे परिणाम, थोडक्यात सांगायचे म्हणजे, दुर्दैवी ठरू शकतील.

ह्या नव्या अस्त्रांचे अर्से आवर्राष्ट्रीय विकीरण प्रचंड प्रमाणावरील आण्वीक प्रतिबंधक प्रतिकाराच्या प्रचलित सिद्धांताच्या वर सुद्धा प्रभाव पाडू शकेल. आज विशिष्ट संरक्षणशीं हीच आमच्या सुरक्षिततेची सर्वोत्तम आशा ठरू शकेल तथापि तिची उभारणी, अन्य गोष्टींच्या समान, जगात दोन प्रबलांचें अस्तित्व असल्याच्या अनुमानाच्या पायावर केलेली आहे आता या अनुमानात अतिरंजित सुलभता आली असून, लवकरच घटना त्याच्यावर मात करतील

समजा, कधींकाळीं आपल्याला जर ह्या भयानक स्वमग्न परिस्थितीत जावें लागलें, कीं जेथें दहानारा देश, प्रत्येकी हैड्रोजन अस्त्राचे आपापले साठे करून घेतल्यावर, आतर्राष्ट्रीय पळयाच्या अस्त्रागिरीं, एकमेकांच्या प्रदेशातील अचूक मारा करण्यासाठीं तळ निश्चीत करून, नवर जर एकजण दुसऱ्याच्या मर्मस्थानीं आघात करू लागला, तर ते हा हे अनेक बाजूना असलेले प्रतिबंधक पायबंद कशा प्रकारें कार्यक्षम होतील बरें !

हें सगळें असें सुचवितें कीं, ज्या प्रचंडाकार प्रतिकाराच्या आणि आण्विक प्रतिबंधकाच्या सिद्धांताला मी समजस परराष्ट्रीय आणि लष्करी धोरणाचें एक आवश्यक—नव्हे केवळ एकमेव आवश्यक तत्त्व मानतो, तो आदर्शापासून योजनभर दूर आहे त्याच्यामुळें शांततेच्या समस्येचे दीर्घकालीन समाधान होण्यापेक्षां, फार तर कालापहरणासाठीं अस्तजिवी पद्धतीची तरतूद मात्र होत असल्याचें दिसून येतें

आपण याच प्रसंगीं आण्विकास्त्राचा ताबा आणि आण्विक युद्ध पुकारण्याची योग्यता याच्या, राष्ट्रीय सार्वभौमत्वाचा सिद्धांत आणि व्यवहार याच्यावर पडणाऱ्या प्रभावाची आठवण स्वत करून घेतलेली बरी एका शतकापूर्वी जॉन स्टुअर्ट मिल यानी आपल्या सुप्रसिद्ध "स्वातंत्र्यावरील' प्रबंधात "आत्मलक्षी" आणि 'अन्यलक्षी" कृत्यें कोणती, या संबधी एक फरक आंखून दिल्यानें तुमच्या लक्षात असेलच त्याच्या नीतिशास्त्राच्या पद्धतीत समाजाच्या संरक्षणाशीं सुसंगत असलेल्या व्यक्ति स्वातंत्र्याच्या संगोपनाचा पाया हाच होता आपल्याला देखील आपल्या स्वत च्या सुरक्षितपणाच्या हित संबधासाठीं आधींच मान्य केलेल्या सार्वभौमत्वाच्या सिद्धांतात असेच कांहीं

करून त्याला पुष्टी जोडावी लागेल. मुद्दा माणसाची राष्ट्राच्या स्वयंनिर्णयावर कितीहि निष्ठा असली तरी, एखाद्या बेजबाबदार राष्ट्राला आपल्या आर्थिक साधनांचा, हैड्रोजन अस्त्रांनिर्मी लांब पल्ल्याच्या मान्याच्या रक्त पिपासु शस्त्रास्त्रांचे ढीग रचण्यासाठी आणि पृथ्वीच्या पाठीवरील आपल्या कोणत्याहि देशान्यावर अचूक निशाणबाजी करणारे मान्याचे तळ बांधण्यासाठी, संपूर्ण विनिमय करूं देण्याची कायदेशीर शक्यता देऊं करणाऱ्या कोणत्याहि सार्वभौमत्वाच्या सिद्धातावर, आंतरराष्ट्रीय पातळीवरून, नित्यकाल विश्वास ठेवीत राहणें, असंभवनीय आहे.

अर्थातच या समस्या पुढें काहीं वर्षांनीं उपस्थित होणाऱ्या आहेत त्याची चिंता आताच वाहणें, हा रिकामा उद्योग दिसण्याचा संभव आहे तथापि त्या समस्या म्हणजे निव्वळ बुद्धि-विलास नव्हे, त्यांच्या संबधीं जिव्हाळ्यानें आणि ज्ञानीपणानें विचार व्हावा, अशा योग्यतेच्या त्या आहेत आजची-फार तर उद्याची समस्याच फक्त लोकांचें चित्त वेधून घेते आणि त्यांना चर्चेला प्रवृत्त करते.

तथापि, आज किंवा उद्या आपल्या सन्मुख उभी ठाकणारी अशी एक समस्या आहे. तिचा उगम ज्या अतिव्यापक मान्यता मिळालेल्या परंतु चुकीच्या दृष्टि कोणातून झाला, तो पुढीलप्रमाणें आहे, सर्व आण्विक अस्त्रें विध्वंसक सामर्थ्याच्या बाबत एकाचप्रकारात जमा होणारीं आहेत, आणि म्हणूनच त्या कुणाचाहि उपयोग जगड्व्याळ महायुद्धा व्यतिरिक्त करण्यात येणार नाहीं, व तसेंच लहानसहान युद्धें, कितीहि झालें तरी, आगळींच असून तितकीशीं संकटमय नसतात आणि फारशा आयासावाचून त्यांच्यापासून अलिप्त राहणें शक्य होत असतें.

केवळ शतावधि सहस्र किंवा लक्ष टन 'टी अेन्टी' च्या समतुल्य असणारीं फक्त मोठीं स्फोटक आण्विक अस्त्रेंच जर अस्तित्वात असतीं, तर हा सिद्धांत सयुक्तिक ठरण्याजोगा होता. अत्यंत हताशेच्या आणि समूळ नाशाच्या युद्धावाचून, कोणत्याहि अन्य युद्धात अशींच प्रचंड विध्वंस करणारीं भीषण अस्त्रें न वापरण्याची मुद्दा शक्यता आहे. हैड्रोजन बॉम्बमुळें होणारा परस्पर विध्वंस आणि त्याच्या पाठोपाठ येणारा संभाव्य प्रश्न घोटाळा टाळण्यासाठीं, कोणत्याहि युद्धात कसल्याहि डावपेंचाच्या

प्रसंगीं हैड्रोजन बॉम्बचा मारा करण्याच्या विरुद्ध, असलें सार्वत्रिक संकट निवारण करण्याच्या दृष्टीनें, उभय पक्षीं आत्मनिषेधाच्या आदेशाला मौन मान्यतामुद्रा मिळण्याचा संभव दिसत आहे

तथापि, आता मोठाल्या प्रचंड विध्वंसक अशा अण्वस्त्राच्या सामर्थ्याच्या मानानें फक्त शेंकडा थोडे टक्के स्फोटक सामर्थ्य असणारीं लघु अण्वस्त्रें सार्वत्रिक झालेलीं आहेत त्यामुळें एक नवाच प्रश्न उद्भवला आहे

राष्ट्राध्यक्ष आयझनहावर १६ मार्च १९५५ रोजीं म्हणाले, "आता कोणत्याहि चकमकीच्या प्रसंगीं, जर या वस्तू-( लघु अण्वस्त्रें ) फक्त लष्करी नेमबाजीच्या विरोधात व फक्त लष्करी कारणासाठीं वापरता येतात, तर मग तुम्हीं ज्याप्रमाणें एखादे बुलेट किंवा अन्यवस्तु वापरतां, त्याप्रमाणें त्यांचा उपयोग का करण्यात येऊ नये, याचें मला कारण दिसत नाहीं "-म्हणून कधीं काळीं स्थानिक अथवा सार्वदेशीक संग्रामाच्या प्रसंगीं हीं कौशल्यपूर्ण लघु अस्त्रें वापरण्यात येणारच नाहींत, असें धरून चालणें, वस्तुस्थितीला सोडून होईल

विमान तळ किंवा वाहतुकीचे मार्ग निकामी करण्यासाठीं परिणामकारक सैनिकी कृत्यें प्रचलित रूढ शस्त्रास्त्रांच्या सहाय्यानें करूं गेल्यास, विध्वंसाचें प्रमाण किमपि कमी न होता, पन्नास किंवा शंभर पटीनें अधिक बॉम्ब, आणि विमानें व वैमानिक त्यासाठीं लागतील. त्या शिवाय, पर नवीं अण्वस्त्रें शक्य त्या प्रत्येक झगड्याच्या प्रसंगीं वापरता येणें शक्य झालें नाहीं, तर ज्याच्या हातीं प्रचंड प्रमाणात ज्यास्ती मनुष्य बळ आहे, आणि जे त्याचा उपयोग टुज्जतखोर निष्ठुरपणानें करायला चुकणार नाहींत, त्यांना काहीं प्रसंगीं स्वतःचा निर्णायक फायदा करून घेता येईल,

म्हणून, आपण जर खरोखरच, अशा कालखंडामध्ये प्रवेश करीत असलों, कीं जेथें अण्वस्त्रें धारण करणाऱ्या सत्ता, लहान अगर मोठ्या युद्धाच्या प्रसंगीं, कोणत्याहि स्वरुपात त्या शस्त्राचा उपयोग करणार नाहींत अशी अपेक्षा करणें चुकीचे असेल, तर मग आपल्याला त्यामुळें संभवणाऱ्या विशिष्ट निष्कर्षांची काळजीपूर्वक तपासणी करावी लागेल

पहिला निष्कर्ष, अर्थातच असा कीं प्रत्येक शक्यप्राय आणि सन्माननीय मार्गानें कोणत्याहि प्रकारची लढाई टाळणें, आता पूर्वीपेक्षा सुद्धा अत्यावश्यक बनलें आहे एखाद्या मेजावर सुरू झालेलें युद्ध लवकरच जगभर पसरण्याची

शक्यता असते एका पक्षाकडून लष्करीवळाच्या विरुद्ध ' ॲ बॉम्ब ' डावपेचानें वापरण्यांत आले, तर दुसरा पक्ष आतंकित होऊन भीति, द्वेष आणि विनाश याच्या भरावर भरात निष्ठूरपणानें प्रति डावपेंच म्हणुनतांना राजधानीवर ' ॲच् बॉम्ब ' वापरण्यास प्रवृत्त होईल

माझ्या म्हणण्याचा आशय असा मात्र नव्हे, कीं स्वतंत्र लोकांनीं नेहमींच अशा संकटाच्या किंवा धमकवण्याच्या प्रसंगीं माघार घेत जावी असल्या एकतर्फी माघारी, प्रसंग विशेषीं जरी समजसपणाच्या आणि आवश्यक असल्या, तरी सुद्धा त्याच्यामुळें निर्माण झालेली पोकळी भरून काढतांना, मतिरक्षाची युद्धें सरधी होत असल्या कारणानें, त्या त्या घातनेला कधीच पोषक होत नाहींत त्याचा परिणाम असा होईल कीं, सरधी झालेल्या पक्षाला दुसऱ्या पक्षाच्या आणखी जास्ती माघारी विषयीं अकारण अपेक्षा वारवार आणि सहजासहजीं वाटू लागेल आणि माघार घेऊन अशी सवलत देणाऱ्या पक्षाच्या मनांतल्या वाढता क्रोधाचा भळफळाट आणि वैफल्य अगदीं भडका होण्याच्या स्फोटक बिंदूपर्यंत जाऊन पोहचू शकेल

जेव्हा माघारी घेणें आवश्यक आणि समंजसपणाचें असतें, तेव्हा त्याच्या पाठोपाठच सघर्ष टाळण्यासाठीं आणि त्याच्या कारणाचें निर्मूलन करण्यासाठीं दुसऱ्या हालचाली सुद्धा अर्थातच सुरू झाल्या पाहिजेत तटस्थ सीमा किंवा तटस्थ रेषा अशा प्रसंगीं उपयोगी पडतात कोरियात अशीच भूप्रदेशावरील तटस्थ रेषा आखून देण्याचा प्रयत्न करण्यात आला, आणि इतरत्र देखील भू किंवा सागर प्रदेशावर असा प्रयत्न करणें उपयुक्त होऊ शकेल युद्ध तहकूबी, तात्पुरता तह आणि सेनाविराम याची व्यवस्था विशिष्ट प्रसंगीं उपयोगी पडत असत आणि त्यावेळीं शस्त्र सामर्थ्य न वापरण्याचे करारमदार होत असतात

अशा प्रकारचे उपाय किंवा तातडीचे मार्ग, अधिक मूल्यग्राही आणि प्रगल्भ समाधानाचे मार्ग सापडे तोंपर्यंत, कालापहरण करण्याच्या दृष्टीनें आणि महासागरांच्या व भूखंडाच्या सीमा त्वरेनें ओलांडून जगभर पसरू पाहणाऱ्या, व आपलें " सनातनी " स्वरूप तसेंच कायम ठेवण्यास समर्थ नसलेल्या युद्धाला थोपवून धरण्याच्या दृष्टीनें, उपयुक्त ठरत असल्यामुळें सुज्ञांनीं त्याच्याबद्दल घृणा दर्शविणें, योग्य होणार नाहीं

हे असले तात्पुरते उपाय जरी नेहमीं अमलात आणावे लागले, तरी त्याच्यामुळें मूलग्राही समाधानाच्या आपल्या महत्त्वाच्या आणि सतत चालल्या शोधाच्या कार्यात लंड पडू नये. या शोधाच्या कार्यांत आपण हें मान विसरता कामा नये, कीं आपलें संकट तांत्रिक नसून राजकीय स्वरूपाचें आहे त्याचा उगम अभूतपूर्व स्फोटक सामर्थ्य असलेल्या अण्वस्त्राच्या विध्वंसक कार्य पद्धतीच्या शोधात नसून, तो या कार्यपद्धतींचा ताबा आता शतकानुशतकें एकमेकांच्या विरुद्ध सामर्थ्य वापरणाऱ्या मनुष्याच्या हातीं गेल्याच्या वस्तुस्थितीमध्यें आहे

म्हणूनच आपण आपला वेळ, आपल्या शक्ती, आणि योजकता फक्त या नव्या अस्त्रांच्या प्रतिकारार्थ आणि प्रति चढाईसाठीं व्यूहरचना आणि पवित्रे ठरविण्याच्या कामीं अगदीं शेवटल्या थराला जाईपर्यंत केंद्रित न करण्याची दक्षता घेतली पाहिजे, नाहींतर आपल्या हातून आंतर्राष्ट्रीय समस्येचें समाधान अथवा आंतर्राष्ट्रीय प्रश्नोभाचें शमन करण्याच्या अधिक महत्त्वाच्या कार्यात त्याचा उपयोग करण्याच्या कामीं लोळता किंवा गैर समजाचें वर्तन घडण्याचा संभव आहे

युद्धानें आमचा अंत होण्याच्या आधींच आम्हीं त्याचा अंत करण्याचें, व ज्याचें आम्हाला सकारण भय वाटत असतें, त्याच्याशीं एकवाक्यता करण्यासाठीं मार्ग धुंडाळण्याचें, व तरवारीच्या पात्यांचे नांगराचे फाळ बनविण्याचें ध्येय अजूनहि अस्तित्वात आहे म्हणूनच आपण, ज्यांनीं हिंसेचा अधिकार धर्म म्हणून केलेला आहे, त्यांचें मन वळविण्याचें बिकट आणि सक्तदर्शनीं नेहमीं निराशमय वाटणारें कार्य करण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे, आणि आतां सरते शेवटीं हिंसेचें अंतिम पर्यवसान विश्वाच्या विनाशांत होणार असल्यामुळें, तिचें अनुसरण परवडणारें शक्य होणार नाहीं, असें त्यांच्या मनावर बिंबून देण्याचा प्रयत्न केला पाहिजे

मानवजातीचें अस्तित्व टिकविण्याच्या आशेचें अधिष्ठान विश्वव्यापी अहिंसेच्या साधनेवर ठेवण्याची कल्पना अद्भुत वाण्याइतकी अवास्तव दिसत असली, तरी मुद्दा अधिकाधिक हिंसेवर विश्वासून राहण्यापेक्षां तिच्यावर कमीत कमी विश्वसून राहण्याचा एकदम प्रयत्न करणें, आणि कमीत कमी हिंसेची कास धरून अधिक हिंसेपासून परावृत्त होणें, आपल्याला कां शक्य

होऊ नये, याचें कारण समजत नाहीं या दोन्हीं दिशादर्शनात प्रगतीला पुष्कळच वाव आहे

आण्विक अस्त्राचा उपयोग कधींहि करावा लागू नये, आणि अन्य सरकाराच्या विरोधात आपलीं उद्दिष्टें प्राप्त करून घेण्याच्या कामीं कोणत्याहि सरकारनें या किंवा अन्य हिंसेचा उपयोग करू नये कारण तें रानटीपणाचेंच नव्हे, तर घोक्याचें दलील आहे त्याची अत पर या आधुनिक जगात गय करण्यात येणार नाहीं, याची दखल सर्व सरकारांनीं घ्यावी अशी आशा आपण सर्वच करीत आहोंत तरीसुद्धा मानवी संस्कृतीचें आणि कदाचित मानववंशाचें देखील भवितव्य, हें आत्मसंयमनाचें अंतिम ध्येय एकाएकीं गांठण्यावर सरेंस्वी, विसंबून राहू देणें क्वचितच शक्य होईल

म्हणूनच शक्य झाल्यास, प्रमाणबद्धतेचा एक सिद्धांत प्रस्थापित करण्याचा सुद्धा आपण प्रयत्न करून पाहिला पाहिजे आणि वस्तुस्थितीच्या निर्विकार तर्कनिष्ठेनें तो दुसऱ्या पक्षावर लादण्यात आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली पाहिजे तुमच्या विरुद्ध जर सामर्थ्य वापरण्यात आलें तर प्रतिकार करताना त्या कामीं आवश्यक असणाऱ्या सामर्थ्यापेक्षा अधिक सामर्थ्य उपयोगात आणणें हें काहीं अवश्यमेव न्यायाचें ठरणार नाहीं या मार्गाला तुम्हीं, तुम्हाला रुचत असल्यास 'रास्त किंवा माफक प्रतिकाराचा" सिद्धांत असें नाव द्या "प्रचंड प्रतिकारा"च्या प्रमाणें तो काहीं आक्रमणाच्या व अणु सामर्थ्याच्या समस्येचें संपूर्ण निवारण करीत नाहीं, परंतु त्या निवारण–कार्याचा तो एक भाग असतो

या अर्थानें सामर्थ्याचें माप हें त्याच्या स्वरूपाइतकेंच महत्त्वाचें असतें अणु काय अणूला सामर्थ्याचा स्रोत मानून त्याच्या उपयोगाची आणि त्याच्या स्वैर परिमाणाची दखल न घेता त्याला महत्त्व देण्याची, आणि अशारितीनें ज्याला अणूचें गूढ म्हणता येईल त्याला अधिकाधिक मान्यता देण्याची, लोकमताची वाढती प्रवृत्ति खरोखर पसरण्याचा धोका मला दिसत आहे

अर्थातच काहीं प्रसंग असे वैशिष्ट्यपूर्ण असतात कीं त्या ठिकाणीं वापरण्यात आलेल्या सामर्थ्याच्या प्रकाराचें महत्त्व सर्वस्व असतें याची जाणीव मला आहे उदाहरणार्थ, एका विशिष्ट प्रकारची दहशत एका विशिष्ट गौरेतर मानव

येशाला वसविण्यासाठीं आशियाच्या भूमीवर आणि आशियाच्या लोकांवर, दुसऱ्यांदा देखील, लहानसा का असेना, परंतु अणुबॉम्ब मुद्दाम टाकण्यात आला, असा जो दुराग्रह आणि गैरसमज कोण्याचवि लोकांच्या मनात रुजलेला आहे, त्याचें निराकरण करण्यासाठीं युक्तिवाद करताना कितीहि तर्क, तंत्र आणि तत्त्वज्ञान पालथें घातलें, तरी त्यांचा काहींहि उपयोग व्हायचा नाहीं, याची मला नीट आणि पूर्ण जाणीव आहे विशिष्ट प्रसंगात आणि विशिष्ट प्रदेशात कोणतेहि अण्वस्त्र वापरावें किंवा नाहीं, याच्या कोणत्याहि निर्णयात, अर्थातच, त्या प्रतिक्रियेला अत्यंत महत्त्वाचें आणि शक्य तर निर्णयात्मक स्थान असलें पाहिजे परंतु आज जरी विशिष्ट परिस्थितींत आणि विशिष्ट प्रदेशात हा युक्तिवाद ग्राह्य असला तरी, भविष्यकाळासंबंधीं या युक्तिवादावरून नक्की अनुमान करणें, धोक्याचें ठरू शकेल.

आण्विक अस्त्राचा उपयोग कधींच करण्यात येणार नाहीं, अशी आशा आपण करू. यांत्रिक तोफा आणि (लांब पल्ल्याच्या) हॉवित्झर तोफा सुद्धा वापरण्यात येणार नाहींत, अशी सुद्धा आशा आपण करू. खुद्द हिंसा दूषणास्पद मानण्याच्या ऐवजीं केवळ आण्विक अस्त्राच्या दोषाना निव्वळ डोळे मिटून जगभर मान्यता मिळाली, तरी त्यामुळें एक धोका उद्भवतो, असें मला सुचवायचें आहे कारण त्या धारणेमुळें नित्याचीं प्रचलित शस्त्रास्त्रें वापरून आपल्या राजकीय उद्दिष्टांच्या प्राप्तिसाठीं माणसांची कत्तल उडविणें, इतकें काहीं अवघड नाहीं, अशी समजूत होऊं शकते बंदुकीची गोळी, बाण किंवा अणुस्फोटक यातलें कोणतेंहि शस्त्र वापरलें, तरी मनुष्य ठार हा होतोच आपल्याला निषेध करायचा आहे तो सामर्थ्यांच्या उपयोगाचा, नुसता त्याच्या पदार्थवाचक साधनांचा निषेध काय कामाचा !

एखाद्या विमानतळाचा विध्वंस करण्यासाठीं दहा टनी भेंभर बॉम्ब गोळ्यांचा मारा करणारीं शंभर विमानें पाठविणें आणि तितकेंच विध्वंसक सामर्थ्य असलेलें एक आण्विक अस्त्र टाकण्यासाठीं एक विमान पाठविणें, यांच्यात स्वाभाविकतः पुष्कळ भेद असतात. ते भेद तांत्रिक किंवा मानसशास्त्रीय अगर राजकीय सुद्धा असू शकतात. परंतु तेथें नैतिक भेदाना मात्र थारा नाहीं.

याच्या उलट, आक्रमक युद्धाच्या चढाईच्या दृष्टीनें विमानतळ, लष्करी

जवगी किंवा युद्धनौका यांच्यावर कोणत्याहि प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं मारा केल्यामुळें, त्याचा सूड घेण्यासाठीं दशलक्ष टन 'टी ऍन्टीटी' स्फोटक सामर्थ्य असणारा एकच हैड्रोजन बॉम्ब आक्रमकाच्या किंवा त्याच्या साथीदाराच्या प्रदेशामधील लोकांनीं गजबजलेल्या शहरावर टाकण्याचें कृत्य, सुबुद्ध आणि समकक्ष मनुष्याना न्यायोचित वाटू शकणार नाहीं माझ्यामतें याचा प्रत्यक्ष संबंध, ज्याचा मी आधींच "प्रचंड प्रतिकार"चें तत्त्व म्हणून उल्लेख केलेला आहे, त्याच्याशीं पोंचतो

म्हणूनच या तत्त्वाच्यासंबंधीं आणि पायबंदाच्या सिद्धांताविषयीं प्रसिद्ध झालेल्या पुष्कळ विचाराचा आणि भाषणाचा परामर्श घेणें आता महत्त्वाचें ठरेल प्रचंड प्रतिहल्ल्याची क्षमता, आणि विशिष्ट परिस्थितीत ती क्षमता वापरण्याचा असंदिग्ध घोषित निर्धार, हाच माझ्या मतें सभाव्य आक्रमका विरुद्ध आवश्यक पायबंद होऊ शकेल आणि त्याला त्वरित व अंतिम विजयाच्या आशेनें सर्वव्यापी आकस्मिक आक्रमण करण्याच्या मोहापासून परावृत्त करू शकेल परंतु अशा प्रकारची प्रचंड प्रतिहल्ल्याची क्षमता आमच्या पक्षाकडून एखाद्या स्थानिक स्वरूपाच्या आक्रमणाच्या किंवा संघर्षाच्या विरुद्ध प्रतिहल्ला करण्याच्या कामीं, किंवा एखाद्या प्रचंड नसू शकणाऱ्या आक्रमणापासून सरक्षण करण्याच्या दृष्टीनें वापरण्याची कोणतीहि कल्पना अचाट आणि अवास्तव समजावी अशा सिद्धांताला मान्यता देणें म्हणजे एका बड्या युद्ध नौकेला किंवा चिमुकल्या बेटाला दिलेल्या धमकीचें प्रत्युत्तर त्या भूखंडावर अणु बॉम्बचा हल्ला करून देण्याच्या निर्णयावर सर्वंच जगाचें भवितव्य टांगून ठेवण्यासारखें होणार आहे

कोणत्याहि प्रकारच्या अस्त्राच्या बाबतींत "राहीन तर तुपाशी, नाहींतर उपाशी," अशी वृत्ति बाळगून खेळ करणें अत्यंत भयप्रद आहे दोन्हीं पक्षांनीं जेथें अण्वास्त्रें धारण केलेलीं आहेत, अशा या युगात कमाल आक्रमणा व्यतिरिक्त अन्य प्रसंगीं कमाल पायबंद घालण्याचा न्याय अनुसरणें, उभय पक्षीं घातुक ठरू शकेल

खरोखर, हा न्याय नेहमींच असमर्थनीय ठरत आलेला आहे, हेंच मला सुचवायचें आहे जुना "जशास तसे"चा न्याय लक्षात आणा आता हा न्याय व्यक्तींच्या संदर्भात सर्वे सामान्यत , निदान पाश्चात्य जगात तरी, रानटी आणि

अगदीं याच तत्वाचें अमेरिकेच्या कायद्यातून निवडून घेतलेलें 'राज्य विरुद्ध शेफर' या खटल्यामधील उदाहरणादाखल अवतरण व्हॉर्टनेनें खालील शब्दांत दिलेलें आहे,—

"एखाद्या हल्ल्याचा प्रतिकार करताना, किंवा तो परतवून लावताना, त्यासाठीं आवश्यक असलेल्या बळापेक्षा अधिक जास्ती बळ वापरण्यात येऊ नये, आणि हल्ला झालेली व्यक्ति जर स्वसंरक्षणार्थ वाजवीपेक्षा अधिक बळ त्याकामीं उपयोगात आणील तर ती आक्रमक ठरू शकेल • • "

इंग्लिश कायद्यात देखील या तत्वाचा अंतर्भाव आहे हॅल्सबरीच्या Laws of England (इंग्लंडचे कायदे) या पुस्तकाच्या ४४८ पृष्ठावर असा मजकूर आहे—

"कायदेशीरपणानें स्वतःचें किंवा स्वतःच्या घराचें संरक्षण करणाऱ्या व्यक्तीवर आक्रमक ठार होईतों माघार घेण्याचें किंवा शरणागति पत्करण्याचें बंधन नाहीं, तिला त्याचा पाठलाग करण्याचा आणि पकडून ठेवण्याचा सुद्धा हक्क आहे, परंतु जर आक्रमक कैद झाला असेल, किंवा प्रतिकार न करता पळून जात असेल, आणि नंतर जर तो ठार झाला असेल, तर मात्र त्याला ठार करणारा हा खुनाचा अपराधी ठरतो "

हेंच मूलभूत तत्त्व फ्रेंच कायद्यात व्यक्त झालेलें आहे "एन सायक्लोपेडि डॅलोझ" या ज्ञानकोशात तें येणें प्रमाणें दिलेलें आहे —

"प्रतिकार हा आक्रमणाच्या मानानें प्रमाणबद्ध असला पाहिजे, सर्व अतिरेक,-विशेषत मालमत्तेच्या कायदेशीर संरक्षणाच्या प्रसंगीं, अवश्य टाळले पाहिजेत विशेष प्रक्षोभक परिस्थिती वगळल्यास, आत्मसंरक्षणार्थ अतिरेकाचीं कृत्यें करणें समर्थनीय नाहीं "

आणि "डॅनिडचु डे ब्हेग्निस–डॉइट क्रिमिनेल" २३३ पृष्ठावर नमूद करतें कीं—

"एखाद्यावर हल्ला झाला, ही वस्तुस्थिती असली तरी त्याचा अर्थ त्यानें स्वसंरक्षणाच्या नांवाखालीं आक्रमकाला अमर्यादित प्रमाणात इजा करणें कायदेशीर होतें, असा नाहीं "

माझ्या मतें या अणुयुगांत, आपणसुद्धा संयुक्त राष्ट्रसंघाच्या सनदेमध्यें ५१ व्या कलमात, व्यक्तिगत किंवा सामुदायिक आत्मसंरक्षणाच्या हक्काच्या संदर्भात,

अनुस्यूत करण्यात आलेल्या, सद्यमान मर्यादा घालणाऱ्या तत्त्वाला मान्यता देण्याचा शहाणपणा सर्वथैव युक्त ठरेल. याच कल्पनेच्या आधारावर उत्तर अॅटलांटिक तहनामा, मॅनिला करार, परस्पर सहाय्याचा आंतर अमेरिकन तहनामा आणि स्वतंत्र जगातील इतर संरक्षक मैत्रीचे करारनामे उभे आहेत.

आत्मसंरक्षणासाठी समर्थनीयपणानें वापरतां येऊं शकणाऱ्या सामर्थ्याचें प्रमाणांवरील बंधनाचा, त्याला एखाद्या आक्रमकानें अन्योन्यपणानें पूर्वी मान्यता दिली, या कारणानें शर्त म्हणून सुसंस्कृत समाजानें विचार करूं नये. सुसंस्कृत मानवांनीं तत्त्वांकरितां तत्त्व म्हणून आणि आपल्या संस्कृतिसाठीच त्याचा स्वीकार केला पाहिजे. कुठें एखादी फटकट उद्भवल्यास, या तत्त्वाच्या अंमलबजावणीमुळें आक्रमण मोडून काढण्या इतक्या आवश्यक किमान मर्यादेपर्यंत ती फटकट आटोक्यात आणण्यास, आणि विशेष म्हणजे पुन्हां शांतता प्रस्थापित करण्यास सहाय्य होत असतें.

एखाद्या राष्ट्रानें जर आपल्या शेजाऱ्यावर आक्रमण करतांना सामर्थ्याचा उपयोग केला, तर तें शेजारी राष्ट्र आणि त्याचे सहकारी, आणि वस्तुतः संयुक्त राष्ट्र संघाच्या सनदेच्या तत्त्वांना अनुसरून वागणारा संपूर्ण स्वतंत्र लोकसमाज, तें आक्रमण मोडून काढण्यास आपलें सामुदायिक सामर्थ्य समर्थनीयपणें वापरण्यास कमी करणार नाहींत; कारण तसें करणें त्यांना वस्तुतः बंधनकारक आहे. तथापि, त्याच्यामुळें त्यांना आक्रमक समाजाचा संपूर्ण विनाश करण्याचा प्रयत्न करण्यासाठीं प्रचंड आणि अमर्याद सामर्थ्य वापरण्याचा मात्र नैतिक परवाना मिळालेला नसतो.

आतां असा एक युक्तिवाद करण्यांत येईल कीं, प्रतिबंधकाच्या सामर्थ्यावर बंधन असावें, अशी सूचना करणारा कोणताहि सिद्धांत केवळ आक्रमण अधिक संभवनीय आणि त्याचें यश अधिक सुलभ करूं शकेल. तथापि कौटुंबिक कायद्यांत या तत्त्वाचा असा कांहीं परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं, आणि जरी परिस्थिति अति निराळी असली तरीसुद्धां राष्ट्रांच्या समाज रचनेत त्याचा तसा परिणाम होण्याची कांहींहि गरज दिसून येत नाहीं. तें कांहिंहि असो, परंतु या तत्त्वावांचून सगळ्या मनुष्य जातीचें प्रत्यक्ष अस्तित्व सर्व नाशाच्या खाईत लोटल्या जाण्याची शक्यता मात्र आतां एक किंवा कांहीं योज्या व्यक्तींच्या अट्टाहासामुळें निर्माण झालेली आहे.

"शांतता ही अविभाज्य असते," अशी सवंग उक्ति ज्याच्या त्याच्या तोंडी या अलीकडील कांहीं दशकांत झाली असून, तिच्याकडे या सामर्थ्याला बंधन घालण्याच्या सिद्धांताचा कल आहे. एकाअर्थी ती उक्ति निःसंशय खरी आहे, परंतु दुसऱ्या अर्थानें ती मिथ्या मुद्दा आहे. एखाद्या भागीं कटकट उद्भवली तरी तिच्यामुळें सर्वच राष्ट्रांनी सर्वत्र जागरूक राहिलें पाहिजे, कारण त्यामुळे शांततेचा भंग होईल आणि सारी धरती हिंसेनें व्यापल्या जाईल, असा इशारा आपल्या या परस्परावलंबी जगाला देणारी ज्ञानदृष्टि म्हणून त्या उक्तीचा खरेपणा पटतो.

तथापि त्या शांततेच्या अविभाज्यपणाच्या कल्पनेंत जर एखाद्या स्थानिक कटकटीचें पर्यवसान आवश्यकपणानें आणि अपरिहार्यतेनें जागतिक संघर्षांत होईल, म्हणून त्या दृष्टीनें तिचा बंदोबस्त केला पाहिजे, ही विचारसरणी अंतर्भूत असेल, तर मग ती मिथ्या आणि भयावह मुद्दा आहे. अर्थांतच तसा धोका नेहमीच संभवतो हे मान्य करें. हा अत्यंत वास्तविक धोका दर्शविण्याचा प्रयत्न मी केलेला आहेच. तरीसुद्धा हा धोका खात्रीनें निर्माण होणार असें जर आपण मानून चाललो, तर या सिद्धांतामुळें ह्या किंवा त्या पक्षाची सहज दिशाभूल होईल, आणि तो मोठ्या प्रमाणावर उपाय योजना करण्याचे मनांत आणून तसा, धोका खरोखरच खात्रीपूर्वक ओढवून घेईल.

या बाबतींत बऱ्याचशा लष्करी व राजकीय सनातनी सिद्धांतापेक्षां सरकारांच्या अंतःप्रेरणा अधिक चोखंदळ असतात, असें सिद्ध झाल्याचें मला वाटत आहे. निर्भेळ लष्करी तर्कशास्त्राला (असें एखादें शास्त्र अस्तित्वात असल्यास) धाब्यावर बसवून कोरियन युद्ध, इंडोचिनी संघर्ष आणि अरब इस्रायली झटापटी, याने स्वरुप स्थानिक ठेवण्यात याचे पर्यंतर आलें.

"वसुधैव कुटुंबकम्" असा उदार चरित न्याय नेहमीं आमचे धर्मधुरीण प्रतिपादन करीत आले. एकाअर्थी तो केवळ अलंकारिक नाहीं. ही वस्तुस्थिति धर्म मार्गांपेक्षां, तांत्रिक प्रगतीमुळें आलेल्या वाढत्या परस्परावलंबी भौतिक व्यवहारांत अधिकाधिक प्रमाणांत स्पष्ट दिसून येत आहे. तथापि जर हें विश्व कुटुंब आपल्याला चिराबु राखायचें असेल, तर आपण त्याच्या ऐक्यांत अंतर्भूत झालेल्या गोष्टींची जाणीव त्वरेनें करून घेतली पाहिजे, आणि ती खोल बिंबवून घेऊन त्याप्रमाणें वागायला लागले पाहिजे.

जर समजा आपण मिळून एक शरीर आहोंत, तर त्यानें एक बोट कापलें म्हणून, त्याचा सबंध हात तोडून टाकणें, आवश्यकपणाचें तर नव्हेच, पण शहाणपणाचें दलील होणार नाहीं एका डोळयासाठीं एक जीव घेण्याचा आदेश देणारें धर्मवचन बायबल मध्यें आढळत नाहीं।

तथापि, एका प्रकरणीं कोणत्याहि प्रकारचें सामर्थ्य वापरण्यास परावृत्त करणारा आणि दुसऱ्या प्रकरणीं अमर्यादित सामर्थ्य वापरण्यापासून परावृत्त करणारा, असा हा सिद्धांत आपल्याला पुरेसा वाटत नाहीं आपल्याला आणखी सुद्धा एका सिद्धांताची गरज आहे, आपल्याला कधीं काळीं जर सामर्थ्याचा उपयोग करणें आवश्यक झालें, तर ज्या हेतूसाठीं तें वापरण्यात येईल, त्याच्या संबंधीचा तो सिद्धांत होय.

या संदर्भात आणखी एक उक्ति असून, माझ्या मतें तिचें परीक्षण करण्यास जरा उशिरच होत आहे "युद्धाचा अंतिम हेतु म्हणजे विजयप्राप्ति," अशी ती उक्ति असून, पुनरपि ती सुद्धां एका अर्थी खरी आहे. मात्र ती सोळा आणे खरी नाहीं मानसिक सुस्तपणाला चकटू घालण्यासाठीं ही घोषणा ठीक आहे या शतकामधील दोन महायुद्धांत, पाश्चात्य लोकसत्ताच्या प्रमाणेंच इतरत्र देखील अनेकांनीं जसा या घोषणेचा स्वीकार सत्य म्हणून केलेला होता, त्या प्रमाणेंच तिला आज संपूर्ण सत्य मानण्यापर्यंत आपली मजल गेल्यास, त्याची परिणति दीर्घकाळ चालणाऱ्या आणि अभूतपूर्व प्राणहानि होणाऱ्या, तद्वतच विजयोत्तर राजकीय परिस्थिती संबंधीं फारसा विचार न करता संपूर्ण विध्वंस आणि बिनशर्त शरणागति घडवून आणण्याच्या हेतूनें [illegible] येणाऱ्या लष्करी हालचालींनी युक्त असा सर्वंकष युद्धाच्या मध्यें होत राहील. संक्षेपत त्याची परिणति युद्ध जिंकण्यात, परंतु शांततेला जिंकून घेतांना पराभूत होण्याचा अनुभव घेण्यात होत असते हा अनुभव आपल्या चांगल्याच परिचयाचा आहे. आणि युद्धाचा अंतिम हेतु, विजयापेक्षासुद्धा शांतता हाच अधिक्त असतो.

अगदीं युद्धाच्या ऐन धूमश्चक्रीच्या वेळींसुद्धां, आपण केवळ लष्करी विजयावर नजर न ठेवता, युद्धकालानंतरच्या आपल्या दीर्घकालीन उद्दिष्टावरली आपली नजर या ढळू देऊं नये, आणि जुल्मी राजवटी व दुष्ट उद्दिष्टें हीं क्षणभंगूर असून, यावत्काल या धरित्रीवर जीवसृष्टीला शाश्वतपण लाभणार आहे, तावत्काल ही मनुष्य जात सुद्धा जिवंत राहील, याचें स्मरण आपण आपणास

का असू द्यावें, याचें कारण हें होय. म्हणूनच या विश्वयुद्धांतील लोकांच्यामध्यें गंभीर आणि चिरकाल टिकणाऱ्या वैराची भावना निर्माण करणें, मग त्याचें कारण कितीहि प्रामाणिक असलें तरी, मूर्खपणाचें व बेजबाबदारीचें आहे

त्या शत्रूंच्या सैन्यांनीं केलेले अन्याय आणि क्रौर्यांची कृत्यें, आणि भोगावया लागलेल्या यातना यांच्याविषयीं माणसांना कडवटपणा आणि अप्रीति वाटत असते,—आणि बरोबर त्यांना तसें वाटणें साहजिक असते असल्या भावना समजण्यासारख्या आणि समर्थनीय असू शकतात ते कसेंहि असलें तरी, आता मानवी संस्कृतीचा संपूर्ण विनाश करण्याचें सामर्थ्य कित्येक सरकारांच्या ताब्यांत असण्याच्या किंवा लवकरच येण्याच्या युगात, अशा एका गोष्टीचें विस्मरण न होऊ देणें अत्यावश्यक आहे कीं, अतःपर अभूतपूर्वतेनें प्रगल्भ युद्धहीनपणाचा मूलभूत महत्त्वाचा आणि अन्य उद्दिष्टांना मागें सारणारा हेतु, देशोदेशींच्या लोकांच्या मनांत सद्भाव निर्माण करण्याचा आणि प्रतिपक्षाचें मन वळविण्याचा हाच अवश्यमेव असला पाहिजे.

कधीं जर युद्धा एखादी लढाई सुरू झाली, तर ती लढाई परतवून किंवा तिचा पराभव करून, आक्रमणानें मुतराम फायदा होत नसतो, हेंच सिद्ध करण्याचा प्रयत्न करून थुंबणें भागणार नाहीं, तर तिचें स्वरूप स्थानिक राखून विशिष्ट हेतु सफल होतां क्षणींच तिचा शेवट घडवून आणण्याचा प्रयत्न सुद्धा अवश्यमेव करावाच लागेल आणि त्या नंतर सुद्धा भावी युद्धांचीं बीजें न रोवूं शकणारा आणि न्यायी परंतु रानटी नसणारा शांततेचा तह घडवून आणण्याच्या प्रयत्नाला तावडतोब लागावें लागेल.

अगदीं अलीकडच्या काळापर्यंत या शांततामयशील लोकसत्तांची यासंबंधांत घडत आलेली वर्तणूक कांहीं मोठीशी समाधानकारक नव्हती दोन्हीं विश्वयुद्धांत निर्दय आक्रमणाच्या विरुद्ध स्वतंत्र जगांत आपोआपच प्रक्षुब्ध जनमत तयार झालें होतें. आक्रमण परतवून लावण्याचें काम हें प्रामाणिक युद्धीच्या धर्मयुद्धांत आणि लोकशाहीसाठीं जग निर्मळ राखण्याच्या हेतुपूर्वक प्रयत्नांत परिवर्तित झालेलें होतें

जेव्हां युद्धाच्या ज्वाला धडधडत असतात आणि त्याचा निर्णय अनिश्चीत असतो, तेव्हां लोकसत्तेच्या अंतर्गत आणि दोस्त राष्ट्रांच्या मध्यें मतभेद होण्याच्या भूमिकेवरून राजकीय उद्दिष्टांचा सविस्तर विचार नेहमी बाजूला

टाकून देण्यांत येतो. व्यवहारतः याचा अर्थ असा की, आमच्या शांततेच्या हेतूंची प्रवृत्ति शत्रूंचा नाश आणि पराभव करण्याच्या एकमेव युद्ध हेतूंशी गल्लत करण्याकडे होते, आणि या गल्लतीमुळें पुढें युद्धोत्तर अडचणी आणि अपयशें निर्माण होत जातात.

जर्मनीला केवळ शेतीवर उपजीविका करण्याच्या आर्थिक पातळीवर लोटण्याच्या मार्गेनथाऊ योजनेच्या वेटरवणानंतर केवळ थोड्याच वर्षांनी आपण आपल्या सहकारी मंडळांत परत सशस्त्र झालेल्या जर्मनीचें स्वागत केलें, ही घटना लक्षांत ठेवण्यासारखी आणि अनुभवाच्या दृष्टीनें लाभकारक अशी आहे. विकारी १९४५ सालानें जपानचा संपूर्णपणें निर्बल ।शिरजोरी करून सोडलें होतें, परंतु आतां १९५५ च्या सिताबस्त अवस्थेत त्याला अगदी आग्रहपूर्वक मोठ्या प्रमाणावर शस्त्रसामर्थ्यानें सज्ज करण्यांत येत आहे. त्याच त्या राष्ट्रांच्यामध्यें युद्धाचे प्रसंग ओढवणें ही नेहमी एक कायमची अवस्था होऊन बसते, आणि सर्वसाधारण किंवा स्पष्टीकरण न केलेल्या उद्दिष्टांनीं क्वचितच शाश्वत शांतता निर्माण होऊं शकते.

मान, अर्थातच, या सर्वांना एक अगत्यपूर्ण महत्त्वाचा अपवाद आहे. जर एखाद्या आक्रमणानें आमच्या जीवनाच्या आणि संस्कृतीच्या केंद्रांच्या वर अण्वास्त्रांनीं सर्वंकष चढाई सुरूं केली, तर तिचें प्रत्युत्तर त्याच प्रकारच्या चढाईनें कसलीहि मर्यादा किंवा बंधन न पाळतां, नाइलाजानें देणें भाग पडेल, याबद्दल मला खात्री वाटते. असल्या विकट प्रसंगीं आक्रमकाची चढाई ही कोणत्याहि युद्धाच्या मोहिमेपेक्षां अधिक विकट असते. तें एक आत्मघातकीच कृत्य असतें आणि तें विजयी पक्षाला देखील तितकेंच हानिप्रद ठरत असतें. अशा प्रकारच्या परिस्थितींत, अर्थातच, खात्री लायक प्रचंड प्रमाणावरील प्रतिहल्ल्याचें प्रतिकारक धोरण हेंच अत्युत्कृष्ट डावपेंच आणि अत्यंत परिणामकारक प्रतिबंधक पायबंद ठरत असतें. हें धोरण जरी युद्ध आणि शांतता यांच्या समस्येचें दीर्घकालीन समाधान नसलें, तरी प्राप्त परिस्थितीत माझ्या कल्पनेप्रमाणें त्याला अन्य पर्यायच सांपडत नाहीं. तरी सुद्धां, शांततेचें अस्तित्व–किंवा निदान युद्धाची अनुपस्थिति, संकटावस्थेत हैड्रोजन बॉम्बवर अवलंबून रहावी, आणि स्थिर सामर्थ्यांच्या दृष्टीनें सामर्थ्यांच्या संतुलनानीं नागा दहशतीच्या संतुलनानें

घ्यावी, ही परिस्थितीच मुळीं त्या शांततेची जाणीव अगर समाधान कुणाला देखील मिळूं देत नाहीं.

तर मग हैड्रोजन बॉम्बचा सर्वंकष आक्रमणाचें महाभीषण अरिष्ट ही एक वेगळी गोष्ट आहे. तथापि कमी प्रमाणावर कोणतेंहि आक्रमण जर सुरू झालें, तर त्याच्या विरुद्ध वापरण्यात येणारें राजकीय आणि लष्करी सामर्थ्य हें मर्यादित व उद्घोषित हेतुपुरतेंच वापरणें हें अगत्यानें महत्त्वाचें असलें पाहिजे, असें मला तरी वाटतें.

या शतकातल्यापेक्षा अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकातील राष्ट्रें या बाबतीत अधिक सुविचारी होतीं. तेव्हा तीं मर्यादित आणि विशिष्ट हेतूनीं युद्धें करीत, आणि तीं बंद करण्यासाठीं यशस्वी वाटाघाटी करीत. सर्वसाधारणतः शत्रूच्या सैन्यानी संपूर्ण शरणागति पत्करण्यापूर्वीच आणि बहुधा त्योनरच कोणत्याच पक्षाला स्पष्ट असा लष्करी विजय मिळण्यापूर्वीच झालेले तह दीर्घकाल शांतता राखू शकत, आणि त्याचा जरा अधिक लाभ प्रबल विद्ध झालेल्या पक्षाला मिळत असे।

सामान्यत स्वहिताचे आणि भौतिक स्वरुपाचे आपले हेतू साधण्यासाठीं करण्यात आलेल्या तेव्हाच्या लष्करी करवाया, आजच्या विसाव्या शतकामधील आमच्या सर्वप्रिय लोकशाहीवादी निष्ठाच्या संग्रामापेक्षा, तुलनेत रक्तपानाच्या बाबतीत कमी न हत्या, तर मान्य होण्यासारखा परिणाम घडवून आणण्याच्या बाबतींत सुद्धा त्या अधिक प्रभावी होत्या, असें म्हणणें व्यदतोव्याघात वाटेल, तरी खरें आहे अशा निष्ठाच्या संग्रामात–युद्ध, शत्रास्त्रें, मुत्सद्देगिरी, विजय, पराजय, आणि प्रायश्चित्त, आणि लोकांच्या भावना,–या बहुतेक सर्व गोष्टी संपूर्णपणें एकरूप होतात. मात्र दुर्दैवानें एकरूपतेच्या या प्रगटीकरणात संपूर्ण शहाणपणा, समजूतदारपणा आणि दूरदृष्टि याची सोबत नेहमींच राहत नसते

या आधीच्या काळात हितसंबधाच्या बाबत तडजोड होण्याची शक्यता ऐन युद्धात देखील असे, आणि अशा रितीनें युद्धाचा शेवट वाटाघाटींनीं होऊ शकत असे आन जर तुमचें युद्ध प्रामाणिक ध्येयानें प्रेरित असा महान निष्ठाचा संग्राम असेल, किंवा तसा देखावा जरी निर्माण करण्यात आला असेल, आणि

त्याचा अन्य हेतु नसेल, तर तडजोडीचा नुसता विचार देखील मनात आणणें पाप ठरतें. त्या शिवाय आणखी, इतिहास अशी साक्ष देत आहे कीं, ज्यावेळीं मनुष्याची दृष्टि विशिष्ट मर्यादित राजकीय उद्दिष्टावर खिळलेली असे आणि हीं राजकीय उद्दिष्टें मनात बाळगूनच जेव्हा ते आपल्या लष्करी हालचाली करीत असत, त्यावेळीं ते आपल्या कृत्याच्या परिणामावर अत्यंत मोठें नियंत्रण ठेवीत असत

" विनशर्त शरणागति " ही जरी लोकांना आकृष्ट करणारी एक राजकीय घोषणा असली, तरी कोणत्याहि युद्धात एखाद्या मोठ्या राष्ट्राची विनशर्त शरणागति हें अत्यंत शहाणपणाचें राजकीय उद्दिष्ट होऊ शकेल कीं नाहीं, याची मला शंका वाटत आहे कोणत्याहि परिस्थितीत तें उद्दिष्ट आंतरराष्ट्रीय पोलिस कारवाई साठीं त्यांनीं अयोग्य ठरल, आणि आजच्या परिस्थितीत तर त्याचा परिणाम युद्धविषयक निर्णायक पक्रियाला बुद्धिविषयक प्रश्नाचें स्वरूप देण्यात होईल

स्वतंत्र जगानें सामर्थ्य, परस्पराचा विनाश करण्याच्या अन्योन्याश्रयी वेदाच्या शस्त्राचें अपवादात्मक प्रसंग सोडल्यास, फक्त मर्यादित राजकीय उद्दिष्टाच्या साठींच वापरण्यात यावें, असें मी सुचवीत आहे त्यातलें प्रमुख उद्दिष्ट म्हणजे आक्रमणाला पायबंद घालणें, किंवा तें झालेंच, तर त्याचें स्वरूप स्थानिक राखून आणि त्याचा बिमोड करून, शांतता प्रस्थापित करण्याचा मार्ग सिद्ध करणें, हें होय

मयंकर प्रतिहल्ल्याच्या सिद्धांतापेक्षां हा कांहींसा न्याय्य पंथ आहे आक्रमकांना शिक्षा देण्यापेक्षा तो अधिकत रहाज्याच्या क्षेत्राचें संरक्षण करणारा आणि आणखी एखादा सघर्ष उद्भवूं देण्यास प्रतिबंध घालणारा आहे

या संबंधीं मी दोन उदाहरणे देणार आहे

पॅरिस येथें १९५४ च्या डिसेंबर मध्यें नाटो कौंसिलच्या मंत्र्यांच्या बैठकींत आम्हीं एक निर्णय घेतला त्या निर्णयाचा एक अंश मला विशेष करून महत्वाचा वाटला नाटो क्षेत्राचें संरक्षण करण्यासाठीं आधींच अस्तित्वात असलेल्या संरक्षक योजनांना पूरक संरक्षक योजना म्हणून, अण्वस्त्राचा उपयोग करण्याच्या योजनेचा विकास होण्याची शक्यता त्या ठरावाच्या एका भागामुळ अस्तित्वात आली त्यावेळीं यदाकदाचित पश्चिम युरोपवर आक्रमण झाल्यास,

नाटोच्या युरोपियन सदस्याच्या मुलखाचें अधिक प्रभावीपणानें संरक्षण करण्यासाठीं 'शेप''ला ("सुप्रीम हेड क्वॉर्टर्स अलाइड पावर्स इन युरोप") अधिकार देतां येणाऱ्या युद्ध विषयक डावपेंचाच्या स्वरूपासंबंधीं एक वाक्यता झाली आणि त्यामुळें आक्रमण रोखून धरण्याची मुभा देणाऱ्या एका ढालीची तरतूद झाली नव्या सामर्थ्यावर आधारलेल्या या नव्या युद्धविषयक पवित्र्याचें एक अत्यंत लक्षणीय स्वरूप म्हणजे त्याच्यामुळें नाटोला रशियन जीवनाच्या केंद्रावर प्रतिहल्ला करण्यासाठीं सर्वस्वी अण्वस्त्रावर अवलंबून राहण्याची गरज आता फारशी उरली नाहीं, आणि स्वारी करणाराच्या सैन्याला थोपवून धरण्याच्या व पिरगळून टाकण्याच्या नाटोच्या सामर्थ्यावर अधिक विसंबून राहण्याची गरज त्यामुळें जास्ती वाढली

त्याचप्रमाणें कोरियामधील आक्रमणाच्या वेळीं स्वतंत्र राष्ट्रांची हालचाल मर्यादित होती त्याचा हेतु कांहीं उत्तर कोरिया आणि चीन यांच्यामधील जनतेचा नाश करायचा नव्हता तर युद्ध सीमाबद्ध करून आक्रमण परतवून लावण्याचा आणि मग शांततेची नांदी म्हणून युद्ध-विरामाच्या करारासबंधीं वाटाघाटी करण्याचा होता या अधूऱ्या प्रश्नांनीं आणि मर्यादित धोरणांनीं पाश्चात्य लोकमताच्या निरनिराळ्या विभागात निराशेची आणि वैफल्याची भावना निर्माण होते, हें कबूल केलें पाहिजे मला तरी या बाबतींत असें स्पष्टीकरण सुचवायचें आहे, कीं त्याचें कारण ते प्रश्न हाताळतांना मूळात कांहीं दोष पडले असें नव्हे, तर त्या प्रश्नासबंधीच्या समस्येचें वास्तविक स्वरुप किंवा तेव्हा उपाय योजना करणें भाग पडलें तिचा दीर्घकालीन हेतु, याच्याबद्दल वरील मताच्या लोकांनीं सांगोपांग विचार केला नाहीं किंवा त्यांना सविस्तर माहिती देण्यात आलली नाहीं हें होय

अलीकडील अनुभवावरून आणखी एका सत्याचें प्रत्यंतर आलें कीं युद्ध विषयक पवित्रे हे नेहमी धोरणाचे धार्जिणे असले पाहिजेत त्याच्या हाती घेण्याची मुभत्यारी आली कीं, गेल्या दोन विश्वयुद्धामध्यें घडलें त्याप्रमाणें, विजय प्राप्तीचें पर्यवसान नुसत्या तरवारीच्या मुठीवर हात ठेवणाऱ्या दृष्टी पक्षा, अधिक शहाण्या व अधिक समतोल दूरदृष्टीला ज्या टाळता आल्या असत्या, अशा महागड्या आणि गुंतागुंतीच्या नव्या समस्या निर्माण होण्यात होईल

"युद्ध म्हणजे अन्य मार्गांनीं धोरणाचें सातत्य ठेवणें होय," हें क्लाउझेवित्सचें सुप्रसिद्ध वचन, त्याच्याच देशांत आणि अन्यत्रसुद्धा सामान्यत लोकांना सामर्थ्याचा उपयोगाचें केवळ तर्कशुद्ध समर्थन वाटत असतें परंतु या वचनातला मूळ मुद्दा अत्यंत शहाणपणाचा आहे, असें मला सुचवायचें आहे. लष्करी सामर्थ्य हें नेहमीच परराष्ट्रीय धोरणाचें साधन समजण्यात यावें, आणि शहाण्या धोरणाचा परिपाठ म्हणजे केव्हाहि निर्भेळपणानें, अगदीं प्राथमिक अवस्थेतसुद्धा, एखादी लष्करी हालचाल असू नये, याला या वचनात मान्यता आहे निव्वळ चातुर्याच्या आणि तर्कशास्त्राच्या पातळीवरच असणाऱ्या शहाणपणाच्या सल्ला आणि प्रबुद्ध निर्णय यांचें स्वरूप कधी काळी जरी निर्भेळ लष्करी असू शकेल काय याची मला शंकाच वाटते अशा निर्भेळ लष्करी निर्णयाने परिणाम साध्यें व साधनें यांची गल्लत होण्यात, आणि अपुऱ्या व अदूर दृष्टि उद्दिष्टांच्या पाठीं लागण्यात अंतर्भूत आत्मनाशाला खोटें स्वरूप देण्यास होण्याचा संभव असतो

तथापि आमच्या लोकशाही राज्य-पद्धतींत ज्यांनीं अंतिम निर्णय घेतलाच पाहिजे अशी तरतूद केलेली आहे, त्या आम्हीं निवडून दिलेल्या लोकशाहीच्या पुढाऱ्यांना व्यवहार्य सुयोग्य सल्ला देतांना, जर लष्करी आणि राजकीय विचारीपणाचा योग्य ताळमेळ राखला गेला तर तदनुषंगानें संघटना व संस्था यांच्या संबंधीं घरेलुही उपसिद्धांत काढता येतील तसेंच युद्धविषयक धोरण जर परराष्ट्रीय धोरणाच्या आधारावर दुय्यम व्हावयाचा असेल, तर मग युद्धाच्या प्रसंगीं देण्यात येणाऱ्या तद्विषयक सल्ल्याचें अधिष्ठान, लष्करी समजूतदारपणा आणि राजकीय विचारीपणा यांचें तादात्म्य हेंच असलें पाहिजे, आणि शांततेच्या काळांत परराष्ट्रीय धोरणासंबंधींच्या शिफारशींत, लष्करी आणि मानस शास्त्रीय, आर्थिक आणि इतर राजकीय बाबींच्या संबंधींचें, योग्यपणें मोजून मापून व तोलून सुसंगत केलेल्या मूल्य मापनाचा अंतर्भाव अवश्य केलाच पाहिजे

याचा अर्थ असा होतो कीं, परराष्ट्रीय खात्यातील अधिकारी जेव्हा धोरणासंबंधीं महत्वाच्या शिफारशी करण्याची जबाबदारी स्वीकारण्याच्या दर्जावर जाऊन पोहोंचतील, तेव्हा त्यांच्या ठायीं लष्करी गोष्टी संबंधींचें संपूर्ण आणि प्रगल्भ ज्ञान असलें पाहिजे, आणि त्याचप्रमाणें लष्करी अधिकाऱ्यांना, तसाच

प्रकारच्या दर्जावर जाण्यासाठी, त्याच्या व्यावसायिक शिक्षणाचें एक अंग म्हणून राजकीय आणि परराष्ट्रीय गोष्टी संबंधीची जाणीव आणि ज्ञान असण्याची गरज आहे

ही गरज लक्षात घेऊनच आम्हीं कानडात, दुसऱ्या विश्वयुद्धानंतर लगलीच एक नॅशनल डिफेन्स कॉलेज ( राष्ट्रीय संरक्षण महाविद्यालय ) स्थापन केलें तर्थे आमच्या तिन्हीं प्रकारच्या सशस्त्र दलामधील कर्नल ब्रिगेडियरच्या किंवा त्यासम हुद्दाच्या अधिकाऱ्या समवेत परराष्ट्रीय आणि तत्संबंधित इतर खात्या मधील अधिकाऱ्यांनी, सरकारच्या कोणत्याहि खात्याची जबाबदारी पडलेल्या आणि एकंदरीतें दीर्घ पल्ल्याच्या समस्या असणाऱ्या प्रश्नाचें शिक्षण एक वर्ष देण्यात येत असते अमेरिकेनें एक नॅशनल वॉर कॉलेज ( राष्ट्रीय युद्ध महाविद्यालय ) काढलें तर लंडनमध्यें इंपिरियल डिफेन्स ( साम्राज्य संरक्षण ) कॉलेज या क्षेत्रात आघाडीच एका पिढीपासून कार्य करीत आहे पॅरिसमध्यें १९५१ मध्यें नाटो डिफेन्स कॉलेज काढण्यात आलें असून तेथें आंतरराष्ट्रीय प्रमाणावर अशेच कांहींशें तौलनिक उद्देशाचें शिक्षण देण्यात येत असतें व्यावसायिक शिक्षणाच्या पातळीवर रास्त दिशेनें होणाऱ्या या सर्व हालचाली आहेत

सैन्यें आणि क्षेत्रसेनानीं यांच्यावर कामगिऱ्या सोपविण्या प्रित्यर्थ देण्यात यावयाचे युद्ध विषयक हालचालींच आदेश पद्धतशीरपणानें तयार करण्यासाठीं आणि संरक्षणाच्या कार्यक्रमांबद्दलचे युद्धविषयक हालचालींच्या दृष्टीनें गुण दोष विवेचन आणि आदेशाच मसुदे तयार करण्यासाठीं यथायोग्य प्रकारची यंत्रणा बनवून तिचा विकास करण्याची मुद्दा एक सापेक्ष समस्या आहेच ही यंत्रणा अशी असावी कीं, कोणतेहि प्रश्न निर्णयासाठीं सरकाराच्याकडे जाण्यापूर्वीं त्याच्यासंबंधीं लष्करी, राजकीय आणि अंतर परराष्ट्रीय धोरणा संबंधीच्या बाबतींत संपूर्ण तादात्म्य व्यावहारिक पातळीवरून झालेलें असावें

चालू शतकातील दोन्हीं विश्वयुद्धात, अशा प्रकारचें लष्करी आणि पर राष्ट्रीय धोरणांसंबंधीच्या निर्णयाबद्दलचें सधनात्मक तादात्म्य, सर्वच प्रमुख लोकशाहींच्या पदरीं अभावानें तळपत होतें या बाबतीत अशी कल्पना दिसत होती कीं, एकदां युद्धानें पेट घेतला म्हणजे मग परराष्ट्रीय धोरणाला

मागे सारून लष्करी धोरणाला अग्रस्थान यावें, आणि त्याला जरी सर्व सूत्र चालनाचा अधिकार दिला नाहीं तरी त्याचें सूत्रचालन "संपूर्ण विजय", किंवा "विनशर्त शरणागति", यांच्या सारख्या ठोकळेबाज लष्करी उद्दिष्टाच्या स्वाधीन ठेवावें

ही टीका संबंधित व्यक्तींच्या विरुद्ध नाहीं परंतु माझ्या मतें, या न्याय्य टीकेचा रोख, युद्धधोरणाच्या विविध उद्दिष्टांकडे प्राथमिकपणें लष्करी चष्म्यातून पाहण्यानें विजयाचा आल्हाद कोमेजून टाकणाऱ्या पद्धति विरुद्ध आहे दुसऱ्या विश्वयुद्धाच्या प्रसंगीं सामान्यतः पाश्चात्य दोस्त राष्ट्रांचीं युद्धमंडळें आणि आंतर्राष्ट्रीय संयुक्त युद्धमंडळ, यांचे सर्व सभासद लष्करी पेशाचे सैन्यामधील वरिष्ठ अधिकारीच होते अशा प्रकारचें राजकीय आणि लष्करी नियमनाचें आणि धोरणाचें सुसंवादित्व फक्त ' शिखरावर "च काय तें घडत होतें अशा प्रकारच्या कार्यपद्धतिसाठीं नेहमीच काहीं तें स्थान नेहमीच काहीं शाश्वत शोधीचे आणि प्रभावी असत नाहीं, तेथें घोडचुकांचे वारे वाहत असतात !

आज पुष्कळ प्रमुख लोकशाही राष्ट्रांतून राष्ट्रीय संघटनेमध्यें महत्वाचे फेरबदल होत असून, ते सध्य समस्यांच्या सुजाण जाणीवेचें प्रतिबिंबरूप आहेत, असा मला विश्वास वाटतो आंतर्राष्ट्रीय संघटनेमध्यें सुद्धां फेरबदल होत असून, ते देखील त्याच सुजाण जाणीवेचे प्रतिबिंब रूपच आहे, कारण त्या समस्या अनेकांच्या संयोगामुळें अधिकच समिश्रप्रमाणावर तेथें अस्तित्वात आहेत राष्ट्रीय आणि आंतर्राष्ट्रीय दृष्टीनें आता सर्व समस्या मिश्रीत झालेल्या आहेत, अशी कल्पना करून येथें चेतपणानें ठरेल त्याचप्रमाणें विविध देशांत विचारांची उत्क्रांति करून व्यावहारिक दृष्ट्या निश्चित कालाच्या आधीं, त्या दिशेनें अति हळुवारीनें किंवा अति दूर पर्यंत समस्या रेटीत नेल्यानें त्या मिश्रीत होऊ शकतील, असा समयधर्म दर्शील तितकेच चेतपणानें आहे परंतु तदधीनाच्या दोन पाऊलें पुढें सरत राहल्यामुळें मात्र निर्णय घेणांना त्यांचें मार्गदर्शन मिळू शकेल, आणि अशा मार्गदर्शनाच्यामुळें विचाराचीं पाऊलें योग्य दिशेकडे पडत आहेत, असें खरोखर आश्वासन मानवाला मिळू शकेल

---

# ३ : संयोगी संघटनांचें नवें धोरण

या व्याख्यानमालेचा प्रस्ताव करताना मी असें सुचविलें होतें की ज्या आंतर्राष्ट्रीय समस्या आपल्या पिढीला अनिवार वाटण्याइतक्या भारी आहेत, त्यांचें महत्त्वाचें लक्षण त्यांचें नाविन्य नसून, त्यांचें प्रचंड दैत्याकार प्रमाण होय त्या समस्या मूलत मानवाच्या राजकीय जीवनासंबंधींच्या युगाइतक्याच जुन्या असून, त्या त्याच्यापुढे स्वत च्या राष्ट्रात, किंवा इतर राष्ट्रांच्याबरोबर त्याच्या येणाऱ्या संबंधात उपस्थित होत असतात

धोरणाचें साधन म्हणून आता उपलब्ध झालेल्या अतिशयित वाढत्या सामर्थ्यांच्यामुळें त्या प्रमाणात होणाऱ्या परिवर्तनांची, आणि त्याच्यामुळें निर्माण झालेल्या किंवा आघात बसलेल्या काही समस्यांची चिकित्सा करण्याचा प्रयत्न मी केला आहे

मी आतां ज्याच्या वतीनें परराष्ट्रीय धोरणासंबंधीं निर्णय घेण्यात येतात आणि कृती करण्यात येतात, आणि ज्याला मी राजकीय समाजाचा एक प्रकार म्हणू शकेन, त्याची पाहणी करण्याचें ठरविलें आहे मात्र ती पाहणी केवळ धावती असू शकेल प्रमाणांच्या बाबतीत येथें देखील प्रचंड वाढ झालेली आहे

आपण ज्या न-या युगात आता प्रवेश केलेला आहे, तेथें परराष्ट्रीय धोरण आणि युद्धविषयक हालचालींचें प्रभावी एकक अत पर एखादें राष्ट्र सरकार— मग तें कितीहि मोठें असलें तरी—नसतें, तर विशिष्ट हेतूंनी एकत्र आलेल्या आणि अशी जूट झालेल्या राष्ट्रांची संयोगी संघटना असतें याच्यामुळें संयुक्त पद्धतीच्या अंतर्गत सहकार्य आणि ऐक्य यांचें संवर्धन करण्याच्या समस्येची अत्यंत मोठी तातडी उपस्थित झालेली आहे

या संयुक्त संघटनेची—किंवा जुना आणि काहीसा रांगडा शब्द वापरल्यास, या दोस्त कपूची—सुव्यवस्था राखणें युद्धकाली देखील नेहमीं बिकट असतें शांततेच्या काळात याची नेहमींच गरज नसते आज मात्र असल्या 'युद्ध आणि शांति' च्या काळात त्याची गरज अत्यंत तीव्रतेनें असली, तरी तसें करणें बिकट झालेलें आहे

आंतर्राष्ट्रीय संबंधात अन्य गोष्टींच्या प्रमाणेंच साध्य व साधनें यांच्या गल्लती कटकटीला कारणीभूत होऊं शकतात यांचें एक उदाहरण म्हणजे गट करण्याच्या विरुद्ध एखाद्या स्वतंत्र जनतेची प्रवृत्ति असल्यास, त्यामुळें गोंधळ आणि धोका निर्माण होत असतो

आज उपयोगी संघटना आणि सामुदायिक व्यवस्था, या आपल्याला सुरक्षितता प्राप्त करून देण्यास सहाय्य करण्यासाठीं बनविण्यात आणि आकारातें आणलेल्या आंतर्राष्ट्रीय यंत्रणेचे साधें भागच नसून, त्यांचें महत्त्व त्याहून अधिक आहे, सकल स्वतंत्र समाजाचें मीलन आणि सचोटी यांची-( कितीहि आकारहीन अस्पष्ट असली तरी ) ती अभिव्यक्ति असते मूलत या मीलनाच्या आणि सचोटीच्या भावनेलाच हुकुमशाही नि संदिग्धपणानें धमकी देत असते या समाजाचे ऐक्य आणि चैतन्य यांची गरज केवळ त्यांच्या संरक्षणासाठींच लागत नसते, परंतु त्यांचें संरक्षण आपण करायलाच हवें, अशा प्रवृत्तीची तीं आवश्यक तत्त्वें असतात

मला वाटतें याच कारणामुळें, वेळोवेळीं पुढें करण्यात येणाऱ्या एका सूचनेमुळें आमच्यापैकीं अनेकजण भीतिग्रस्त होत असतात भू-खंडाच्या संरक्षणाच्या उपाय योजनांवर होणारा खर्च आपली अधिक वाटल्यास, किंवा आमच्या युद्ध विषयक हालचालीच्या योजनांसाठीं किंवा शस्त्रास्त्रांच्या साठी-साठीं निराळी शिल्लक काढून ठेवल्यास, उत्तर अमेरिका वेगळा होईल आणि गगना धुडकावून लावील, अशी एक सूचना करण्यात येते

असें भू-खंडाभोंवती कुंपण घालण्याचें धोरण मला तरी अदूरदृष्टीचें वाटत आहे राजकीय दृष्ट्या त्याचा अर्थ असा होतो कीं, इतर स्वतंत्र आणि स्नेहशील राष्ट्रांना आम्हीं आमच्या स्वतःच्या दुर्दैवांच्यापासून अलिप्त राखतो आणि राखू शकतो, आणि आमचीं दोस्त राष्ट्रें हीं केवळ आमच्या घाण्यांचीच साधनें होत या धोरणात एका अशा आत्मकेंद्रित प्रमादी सिद्धांताचा अंतर्भाव करण्यात येतो कीं वॉशिंग्टन आणि ओटावा येथील लोकांना फक्त आपले युद्धविषयक डावपेच आणि आपली सुरक्षितता यांच्या राष्ट्रीय कारणामुळेंच लंडन किंवा पॅरिस, अगर बॉन किंवा कॅनबरा येथील लोकांच्या स्वातंत्र्याविषयीं कळकळ वाटत असते

अर्थातच, सामर्थ्य किंवा युद्धविषयक डावपेच याचा आपण संकोच करणें, किंवा आपल्याला विसर पडू देणें, बरें नव्हे तरीसुद्धा, अण्वास्त्रांचें अमेरिकन शस्त्रागारांचें मूलभूत महत्व असून देखील, स्वतंत्र राष्ट्रांच्या आम्हीं घडवून आणलेल्या महान सयोगीकरणाच्या ऐक्याचें, तितकेंच किंवा अधिक महत्त्व, आज शांततेचा अत्यंत मजबूत पाया म्हणून आहे

आधुनिक शस्त्रास्त्रांच्या क्षेत्रात आमचें सामर्थ्य इतकें प्रचंड आहे, कीं त्याबाबतीत सोव्हियत राज्यकर्ते लोकशाहीविरुद्ध सामना करण्याचें मनांत आणून स्वत चें व आपल्या साम्राज्याचें अस्तित्व धोक्यांत आणण्याचें सकट ओढवून घेतील, असें शक्य वाटत नाहीं कम्युनिस्ट डावपेचांचें प्रमुख तत्व, त्याच्यामतें आमचीं मर्मस्थानें असलेल्या जागा–( म्हणजेच त्यांना ते विसगति असें म्हणतात, ) हुडकून काढून, त्यांचा स्वत च्या हितासाठीं उपयोग करण्याचें असल्याबद्दल भरपूर पुरावा उपलब्ध आहे या साऱ्याच्या बाबतीत त्यांची बहुतक अशी खात्री पूर्वक श्रद्धा दिसते कीं, आमच्यां गटात फूट पाडण्याचा आणि त्याच्यात अविश्वास निर्माण करण्याचा प्रयत्न केल्यानें–विशेषत' अमेरिकेला त्याच्या स्नेह्यांपासून आणि सहाय्यकर्त्या सहकाऱ्यांपासून फोडून वेगळा करण्याचा प्रयत्न केल्यानें, त्यांना कोणतासुद्धां धोका पत्करावा लागणार नाहीं आणि अमल्यास लाभच पदरात पडणार आहे.

म्हणूनच, आपल्या सन्मुख उभ्या असलेल्या अशा परिस्थितीला तोंड देतांना, आपल्याला स्वातंत्र्याचें सरक्षण आणि शांततेचें सगोपन करण्यासाठीं, एकत्रित होऊन कार्य करणाऱ्या राष्ट्रांच्या मध्यें कमालीचें ऐक्य राखणें अगत्याचें आहे

हें असें ऐक्य आधींपासून आहेच असें मात्र आपण खात्रीनें गृहित धरून चालूं शकत नाहीं आपल्या सयोगी सघन्नेचे बहुतेक सगळ सदस्य लोकशाही राष्ट्रें असून, तीं स्वराज्य आणि स्वातंत्र्य याच्या परपरेचे निष्ठेचे पाईक आहेत या अशा सकटाच्या युगात हें योग्य सामर्थ्याचा स्रोत ठरेल कीं दुबळेपणा ठरेल, हें बहुतांशी किती प्रमाणात आपले लोक एकमेकाच्या बरोबर सहकार्य करण्यास राजी होतील, आणि प्रत्यक्ष सहकार्य करू शकतील, आणि तसेंच वेळप्रसगीं आवश्यकता पडल्यास सर्वसाधारण हिताच्या दृष्टीनें, सयोगी

संघटनेची व्यापक गरज लक्षात घेऊन, कमी महत्त्वाच्या राष्ट्रीय गोष्टींना दुय्यम स्थान देण्यास सिद्ध होतील की काय, यांच्यावर अवलंबून आहे

हेंच तत्त्व एखाद्या स्वतंत्र सयोगी संघटनेच्या सदस्याच्या अंतर्गत व्यवहार, एखाद्या स्वतंत्र लोकशाही राष्ट्रांतील नागरिकांच्याप्रमाणें तत्त्वत लागू होत असतें अशातर गोष्टींच्या व्यतिरिक्त, याचा आणखीहि एक अर्थ असा कीं, काहीं धोरणाच्याबद्दल जर महत्त्वाच्या अल्पमतवाल्या गटाचा विरोध असला, आणि त्याला त्या तुलनेला अन्यायाच्यान वाटत नसल्या, तर बहुमतात असलेल्या गटानें आपल्या सत्तेचा दुरुपयोग केला, असें वाटलें, तर तेंव्हा त्याची अमलबजावणी करायची झाल्यास, सर्व फार्णें मोठें पचायतीचें होऊन बसतें अशा धोरणाच्याबद्दल सत्तेत असणारानीं आग्रह धरला तर, त्याच्यामुळें संपूर्ण समाजाच्या ऐक्याला तडा जातो आणि त्याच्या लोकशाही कार्यपद्धतीला धोका निर्माण होतो आपणा अमेरिकेच्या राष्ट्रामधील अतर्गत घरगुती अनुभव ही गोष्ट सिद्ध करीत आहे. आतर्राष्ट्रीय बाबतींत अशी तुलना करणें आपल्याला परवडू शकणार नाहीं

आणखी अधिक मूलभूत मुद्दा असा कीं, एखाद्या लोकशाही प्रमाणेंच लोकशाहीच्या सयोगी संघटनेनें मुद्दा आपल्या संयुक्त कृतीचा निर्णय चर्चा, तडजोड आणि संमति याच्यावरच आधारलेला असावा हा संमतीचा प्रश्न तर विशेषत मोठे आणि सापेक्षत बहुरंगी राष्ट्रीय अगर आतर्राष्ट्रीय समाज असले, म्हणजे अधिक बिकट परंतु अधिक आवश्यक बनत असतो आपण जर या बाबतीत राष्ट्रीय समाजाची चिकित्सा केली, तर आपल्याला आतरराष्ट्रीय समाजात कोणत्या स्वरूपाच्या समस्याना तोंड द्यावें लागेल, याचा थांगपत्ता लागू शकतो

अमेरिका विविध प्रकारचे प्रदेश मिळून बनलेला आहे, आणि अमेरिकन राष्ट्रीय धोरणाचा अनुभव किंवा ज्ञान असलेल्या कोणाहि व्यक्तीला, माझ्या मतें, त्याचें महत्त्व कळण्यासारखें आहे तद्वतच, अफाट विस्ताराच्या आणि बरेच प्रादेशिक विभाग असलेल्या, परंतु भाषा, धर्म आणि संस्कृति याच्या बाबतींत विभिन्नता असलेल्या दोन ठळक वेगळ्या लोकांनी बनलेल्या कॅनडासारख्या देशात, आम्हाला मुद्दा विभिन्न परंपरा आणि

विचारसरणी असणाऱ्या, व निकट साहचर्य होण्याच्या दृष्टीनें सर्वस्वी विघातक गतकालीन स्मृती बाळगणाऱ्या, लोकांच्यामध्यें कार्यान्वित होऊ शकणारी व उभयतांना एक जीव करू शकणारी एकता निर्माण करण्यास, राजकारणाच्या कलेचा उपयोग करण्याकडें विशेष लक्ष पुरवावें लागलें

अमेरिका आणि कॅनडा या दोन्ही देशात आम्हीं ज्या प्रमाणांत ऐक्य भावनेचा प्रारंभ केला होता, त्याच्यापेक्षा किती तरी अधिक मोठ्या राष्ट्रीय प्रमाणावर आता महान ऐक्य संपादन करण्याचें राजकीय कार्य लोकानीं पार पाडण्यांतमध्यें यश मिळविलेंले आहे ते कसें मिळविलें याचें स्मरण या वेळीं करणें बहुमोलाचें ठरू शकेल

ऐतिहासिक सयोगी करणाऱ्या घटनेपासून, कॅनडातल्या राजकीय मुत्सद्दे गिरीचें मार्गदर्शन करणारें तत्त्व असें आहे, कीं महत्त्वाच्या प्रश्नावर धोरण ठरविण्यासाठीं, आणि त्याचा पाठपुरावा करण्यासाठीं राष्ट्राच्या नेत्यानीं देशांतील प्रत्येक मुख्य विभागामधील बहुमताची मान्यता मिळवावी अर्थातच कॅनडा मधल्या आम्हा सर्व लोकांच्या मध्यें, एका विभागा मधील लोकांचा दृष्टिकोन दुसऱ्या विभागातील लोकांच्या दृष्टिकोनापेक्षा बेऱ्हा भिन्न असतो, ते हा तो समजून घेण्यासाठीं, आणि जरी त्याच्यामध्यें एक वाक्यता झाली नाहीं, तरी एकमेकांच्या दृष्टिकोनांबद्दलचा आदर बाळगण्या-साठीं, आवश्यक व पुरशी असणारी सयम आणि जबाबदारीची प्रवृत्ति, बौद्धिक लवचिकपणा आणि नैतिक उंची ज्या प्रमाणात कायम आहे, त्या प्रमाणांत हें सर्व शक्य असतें

आमच्या कॅनडामधील सर्वच विभागांतील लोकानीं स्वत ला ख्रीस्त लावणाऱ्या या सद्गुणाचा विकास आम्हांला ज्याना तोंड द्यावें लागलें अशा संघर्षांना आणि संकटांना पुरेसें पडण्या इतपत मात्रेत नि सदिग्धपणें नेत्या-कारणानें कॅनडातल्या एकतेचें सगोपन आणि संवर्धन होऊ शकलें पचरा वर्षापूर्वी परराष्ट्रीय राजकारण आणि सरक्षण यांच्या धोरणासंबंधी आमच्यांत जरी तीव्र मतभेद होते, परंतु आज आमचें सरक्षणाचें धोरण सुस्पष्ट असण्याचें कारण आम्हीं आता अधिक मात्रेत अतर्गत मिलाफ आणि एकता संपादन करूं शकलों, हें होय

अमेरिकेंतील परिस्थिति देखील सारखी अशीच आहे. तुमच्यांत सुद्धां दोन विभागांतील लोकांत युद्ध झालें होतें. आमचें युद्ध आमच्यांत राष्ट्रीय एकतेचें संघटन होण्यापूर्वी अठराव्या शतकांत झालें होतें, आमचे फ्रेंच भावी देशबांधव त्याला "विजय" असें म्हणतात. तुमचें युद्ध एकोणिसाव्या शतकाच्या मध्यांत तुमचा राज्य-संघ स्थापन झाल्यावर झालें, आणि दुर्दैवानें योद्ध्या दुःखद वर्षांसाठीं राज्यसंघ भंग पावला होता. आपल्या उभय देशींच्या राष्ट्रीय नेत्यांना, त्यामुळेंच, सर्व साधारण उपाय योजनांना विविध गटांचा आणि विभागांचा पाठिंबा, किंवा निदान रुकार तरी, मिळविण्याच्या आवश्यक गोष्टींची तत्पर जाणीव आणि बहुधा नैसर्गिक धारणा आहे. मुत्सद्दी पुरुषांनीं धोरणें आंखतांना अत्यंत परिश्रम घेणें आणि संयम राखणें उपयुक्त ठरतें. कारण शक्य झाल्यास त्यांना, जेथें त्यांची अंमल बजावणी प्रामुख्यानें होत असतें, त्या सर्व भागांतील लोकांचा पाठिंबा मिळूं शकेल. परंतु जेव्हां तसें होऊं शकत नाहीं, तेव्हां निदान सर्व विभागांची स्वखुषीनें आणि पूर्ण जाणीवेनें (बळजरीनें किंवा नाइलाजानें नव्हे), अनुमति तरी मिळविणें, वास्तविक आवश्यक असतें. मोठ्या आणि विशेषतः बहुरंगी लोकसत्तांच्यामध्यें, मत मोजणीच्या स्वयंचलित कार्य पद्धतिवर नेत्यांचें यश अवलंबून राहूं शकत नाहीं.

लोकशाहीमधील यशस्वी राजनीतिधुरंधरांना आपल्या राष्ट्रांत किंवा विभागांत फुटीचीं पूर्वचिन्हें दिसूं लागण्यापूर्वीच बहुधा त्वरेनें तिचा चाहूल घेण्याचें शिक्षण अपरिहार्यतः मिळालेलें असतें. ते केवळ तिचा चाहूलच घेत नाहींत, तर तिला पिटाळून देखील लावीत असतात. ज्या लोकांना आपण जबाबदार आहोत, अशी जाणीव असते, त्यांच्यावर आपल्या शब्दांचा काय प्रभाव पडेल याची जाणीव ठेवून, बोलण्यापूर्वी आपले शब्द तोलून पाहण्याचें शिक्षण सुद्धां त्यांनीं घेतलेलें असतें, नसल्यास त्यांनीं तें घ्यावें !

मर्यादित दृष्टीच्या राजकारणी पुरुषाला हे लोक म्हणजे केवळ त्याचे तात्कालिक घटक-त्याच्या जिल्ह्याचे किंवा राष्ट्राचे मतदार वाटत असतात. परंतु विशाल दृष्टीचा राजकारणी पुरुष-राष्ट्रीय व्यापक धोरणाचा राजकारणी पुरुष-आपल्या शब्दांच्या प्रभावाचें मूल्यमापन करायला चुकायचा नाहीं; मग त्याचे ते शब्द कायदेमंडळातले एखादें तयार केलेलें भाषण असो, किंवा त्या

देशांतील कुठल्याहि विभागातल्या एखाद्या दुसऱ्या लावणाऱ्या पत्रकाराला दिलेली आयत्या वेळची मुलाखत असो, तो आपल्या राष्ट्राचे मूल्यमापन उच्चारण्याच्या आधी करील, नतर नव्हे,—नाहींतर त्याचें राष्ट्रव्यापी पुढारीपण फारकाळ टिकू शकणार नाहीं.

तथापि, आज राष्ट्रव्यापक दृष्टीचे राजनीतिधुरधर देखील अत पर खुजे ठरतील. वस्तुत दुसऱ्या राष्ट्राच्या सीमातर्गत ज्याच्या निष्ठाचे क्षितिज असेल त्याच्या हातून प्रत्यक्ष त्याच्या स्वत च्या देशाची हानीच होईल कारण आजच्या जगात कोणत्याहि राष्ट्राला, अगदीं अत्यत मोठ्या राष्ट्राला सुद्धा, आवश्यक असणाऱ्या सुखोच्या व स्थिर पार्श्वभूमिपासून त्याचे स्वत चें राष्ट्र वेगळे पाडण्याजोगे शब्द आणि प्रवृत्ति ते प्रगट करीत असतात

तर मग, आमच्या स्वतत्र सयोगी संघटनेच्या अतर्गत आज आम्हाला ज्या परिस्थितीला तोंड द्यावयाचें आहे, ती आम्हाला असें आव्हान देत आहे कीं, आम्हीं स्वदेशात दीर्घकालापासून लोकशाही सरकार यशस्वी करण्यात ज्या कलांचा उपयोग केला आणि ज्या कलांत आम्ही पारंगत आणि अनुभवी आहोत, त्या लोकशाही सरकार अमलात आणण्याच्या कला आम्ही नि सदिग्ध-पणानें आणि पूर्वी केव्हाहि आपल्या नजरेतील इतक्या मोठ्या प्रमाणावर, पूर्वीपेक्षा देखील विस्तृत क्षेत्रामध्यें उपयोगात आणाव्यात या आव्हानाला तोंड देणें तितकेंसे सहज नाहीं, परतु त्याला आपण तोंड दिलेंच पाहिजे

कारण स्वतत्र आणि स्वाभिमानी लोकशाही राज्यसत्ताची सयोगी संघटना ही हुकूमशाही राज्यसत्तांना अभिप्रेत असलेल्या एकछत्री शृंखलाबद्ध भूखडावरील साम्राज्यापेक्षा अत्यत वेगळ्या प्रकारची असते लोकशाही जगात मित्र आणि मांडलिक या विरोधी सज्ञा आहेत, कारण स्वतंत्र लोकाच्या मनांत केवळ सामर्थ्याच्या जोरानें सत्ता गाजविण्याच्या दडेलीबद्दल प्रतिकारची भावना निर्माण होत असते

याचा अर्थ असा कीं आपल्याला जर सयोगी संघटना कार्यक्षम करायची असेल, तर आपल्याला आपल्या स्वत च्या राज्याच्यापेक्षा अधिक विशाल सीमांच्या आणि आवश्यकतांच्या अतर्गत, आपलें जीवन व्यतीत करण्याची सवय स्वत ला लावून घेतलीच पाहिजे

अर्थातच, स्वतः या आवश्यकता निकडीच्या विविध मात्रांनिशी वेगवेगळ्या व्यक्तींच्या आणि एकमेकांच्यावर होणाऱ्या कृतींच्या व शब्दांच्या परिणामाच्या मात्रेंत, परस्परांवर अवलंबून असणाऱ्या राष्ट्रांच्यासुद्धां, वस्तुतः, गळ्यांत पडत असतात.

त्या आवश्यकतांचा संबंध राजनीतिधुरंधर आणि मुत्सद्दी, सेनानी आणि दर्यासारंग यांच्याशीं असतो. वस्तुतः त्यांचा संबंध सर्वच नागरिकांच्याबरोबर, आणि विशेषतः ज्यांचे टीकेचे शब्द नेहमीं खळबळजनक पद्धतीनें मोठ्या सतरतेनें वृत्तसंस्था आणि आकाशवाणी टिपून घेतात, आणि ते सविस्तरपणें छापून व ध्वनिक्षेपित करून त्यांना जगभर प्रसिद्धी देतात, त्या नागरिकांच्या बरोबर असतो.

इतर बहुतेक सार्वजनिक व्यक्तींच्या बरोबरीनें स्वतः मला देखील, प्रसंग विशेषीं, अशा प्रकारच्या आकस्मिक दूरपर्यंत सर्वत्र पसरणाऱ्या प्रसिद्धीचा विषय व्हावें लागलें. एकदां माझ्या एका भाषणांत माझ्या शिकागोमधील पूर्वायुष्याचा उल्लेख करतांना, तेथें मी मांसाचें पॅकिंग करणाऱ्या एका मोठ्या व्यापारी कार्पोरेशनमध्यें नोकरीस होतों, असें मी सांगितलें होतें; त्या कार्पोरेशनचें नांव ऑरमर आणि कंपनी होतें. ऑरमर याचा शब्दार्थ चिलखत किंवा कवच येवढाच उचलून, लवकरच एका कम्युनिस्ट आकाशवाणीनें माझ्याबद्दल असें वृत्त जाहीर केलें कीं, माझे आर्थिक हितसंबंध चिलखतें आणि इतर युद्धसाहित्य बनविण्याच्या उद्योगांशीं गुंतलेले होते, अशी कबुली देऊन मी संयुक्त राष्ट्र संघाच्या बैठकींत स्वतःच्या युद्धखोर हालचालींचें गुपित उघड केलें. एखाद्याच्या जाहीर वक्तव्याचे इतके करमणूक करणारे परिणाम कांहीं नेहमीच घडत नसतील !

कुरघोडी करणारे हे एकतेचे हक्क, आणि ती एकता निर्माण करण्यासाठीं कधीं कधीं आवश्यकपणें लागणाऱ्या दिशाया आणि सवलती, यांना मान्यता देणें सर्वश्रेष्ठ बलिष्ठांना, अर्थातच, बिकटतम धाडस असतें. कारण स्वभावतः त्यांना आपल्या सामर्थ्याच्या रास्त वापरीचें प्रोत्साहन मिळत असतें, आणि त्यांचा कल इतरांची अनुमति आहे, असें गृहित धरून चालण्याकडे होत असतो. या प्रवृत्तीमुळे आपला परस्परांतील अनुभव प्रसादहीन अथवा होऊं शकेल.

लोकशाहीचें सार म्हणजे संमतियुक्त अधिकाराचें, आणि जबाबदारीयुक्त प्रभाव आणि सत्ता यांचे समीकरण होय लोकशाहीचा इतिहास वर्णन करावयाचा म्हणजे वस्तुत, आम्हीं त्या ध्येयाप्रत ज्या दीर्घ आणि बिकट वाटेनें जाऊन पोंहचलों, तिची ती कथा आहे या समीकरणानीं निर्माण केलेल्या समस्यांचें निराकरण करतांना आम्हाला आलेल्या यशापयशांच्या काल खंडाची ती हकीकत आहे ज्या प्रमाणात एखाद्या राष्ट्रांत इतरांचे हक्क आणि जबाबदारी मान्य करण्यापेक्षां आणि स्वीकारण्यापेक्षा कोणत्याहि व्यक्तींची किंवा गटाची सत्ता आणि प्रभाव याना अधिक प्राधान्य मिळतें, त्या प्रमाणांत त्या राष्ट्रांत लोकशाही ही केवळ शब्दांचा बुडबुडा मानावा, संपादन करण्यात आलेली एखादी वस्तुस्थिति न हें समान आणि चांगल्या हेतूच्या प्रित्यर्थ एकत्रितपणें कार्य करणाऱ्या राष्ट्रांच्या मधील संबंधाना देखील हेंच तत्त्व लागू करण्यात आलें पाहिजे

अशा गटाच्या कमी सामर्थ्य असलेल्या सदस्याना बलवान सदस्यांची धोरणें आणि प्रवृत्ती यांच्या विषयीं सतर्क व सावध राहण्यास विशेषच कारण राहील, आणि सामान्यतः ज्या मोठ्या समाजाचे भाग ते आहेत, त्याना त्यांच्यावर कोसळणाऱ्या दुहीच्या संकटाची जाणीव अधिक तीव्रतेनें होईल

हें सगळें जरी सत्य असलें तरी देखील त्यानीं नेतृत्वपदाचीं ओझीं आणि अडचणी समजून घेण्याचा आणि ओळखण्याचा सुद्धा प्रयत्न केला पाहिजे आपल्या बलवान मित्राच्या सत्तेबद्दल एखाद्यानें चिंता व्यक्त करणें विहित असलें, तरी त्याविषयीं उगीच कुढत बसणें योग्य होणार नाहीं अधिक लहान राज्यांच्याकडून होणारी टीका जशी शहाणपणाची, विधायक आणि सहाय्यक होऊ शकते तशीच ती छिद्रान्वेषी आणि उपद्रव करणारी देखील होऊ शकते

एखाद्याच्या समीक्षक मतांची सार्वजनिक अभिव्यक्ति केव्हां उपकारक आणि आवश्यक होईल, आणि तिच्यामुळें केव्हा दुहीचें संगोपन होऊन परिणामीं गटामध्यें अंतर्गत दौर्बल्य शिरेल, याचा निर्णय तारतम्य बुद्धि वापरून घेतां यण्याची योग्यता असणें सुद्धा मोठें अगत्याचें आहे बिकट प्रसंगीं मागून जशी राजकीय तंगडओढ करणें विकृतपणाचें आणि धोक्याचें

असतें. त्याचप्रमाणें आघाडीवरलें कुसचालन देखील अशेंच असू शकेल कुसचालन आणि लगट्ओढ, या दोन्हीमुळें उद्भवणाऱ्या सकर्ताचे चित्रीकरण एकदा मागें मी एका व्यंग्यचित्रात पाहिलें होतें चित्राखालीं पुढील सूचक वाक्य होतें, "कारख्यानों, वारा वळण घेत असताना, त्याना छळू नका म्हणून तुम्हाला सागायच तरी किती ?"

सयोगी सघटनेमधील कमी सामर्थ्यांच्या राज्यानीं एक कर्तव्य करून दाखवायचें असतें. त्यांनीं आपलें स्वरूप किंवा आपला स्वतंत्र निर्णय यांच्या बाबतींत शरणागति पत्करणें, हें केव्हाहि अयोग्य आणि अशक्य आहे परंतु सयोगी सघटनेच्या सल्लामसलती प्रभावशाली आणि वजनदार होण्यासाठीं आवश्यक असलेल्या नेतृत्वाचा स्वीकार, आणि सामर्थ्यांचा ताळा, याना मान्यता देण्याइतकी तारतम्य बुद्धि आणि जुळते घेण्याची प्रवृत्ति त्यांनी दाखविली पाहिजे

आमच्या सयोगी सघटनेचे आपल्या अपरंपार सामर्थ्यांमुळें नेतृत्वपद मिळालेले जे सदस्य आहेत, त्याचें देखील, शांतभाव, सयम आणि सहिष्णुता व इतराच्या मताबद्दल सौजन्ययुक्त आदर, या आत्मनिरपेक्ष सद्गुणाचा विकास करण्याचें एक विशिष्ट कर्तव्य आहे

यशस्वी सयोगी संघटनेसाठीं या सगळ्या आवश्यक घटकांत सुसंवादित्व निर्माण करणें, इतकें काहीं सहजसाध्य नसतें त्याच्यासाठी प्रभावी यंत्रणा, आणि अधिक महत्त्वाचें म्हणजे, समान धोरणें आचरण्याची व त्यांचा आधार घेण्याची मनःपूर्वक इच्छा, यांची सुद्धां आवश्यकता असते लोकशाहीच्या राजकीय नेत्यांना त्यांच्या स्वदेशांतील अतर्गत अनुभवांच्या-मुळें असें करणें अतिशय सोपें वाटू शकेल या बाबतीत पुन्हां राष्ट्रीय साम्य-दर्शक गोष्ट तुलनेसाठीं आहेच

जेव्हा एखादी राष्ट्रव्यापी कृति करावयाची असते, तेव्हां तिच्याशीं सबधित असलेल्या सर्व लोकांशी वेळेवर दक्षतापूर्वक सल्ला मसलत करणें, हें लोकशाही मधील नेत्यांचें व्यवहारी स्वरूप असतें मत्री मडळें, समित्या, पक्ष नियामक मंडळें, कामगार सघाच्या सभा किंवा डायरेक्टर बोर्डांच्या बैठकी यांच्या लोक-शाही कार्य पद्धति कशा चालतात, यांचा ज्या कोणाला अनुभव असेल त्याला

एखाद्या नव्या प्रश्नावर आवश्यक निर्णय घेण्यासाठीं तो सार्वजनिक वाद विवादार्थ पुढें ठेवण्यापूर्वी, त्याच्यासंबंधी आपल्या निकटवर्ती सहकाऱ्यांबरोबर खासगी सल्ला मसलत करण्याचें मूल्य कळत असेलच, किंवा त्या बाबतीत त्याला लवकरच शिकायला मिळेल

राष्ट्रांच्या संयोगी संघटना मध्यें देखील याच कार्यपद्धति तितक्याच समानतेनें आवश्यक आहेत पण नेहमीच त्याचा अवलंब करण्यात येतो, असें मात्र नाहीं परंतु माझ्या मतें आपण त्या ध्येयाकडे जाण्याच्या दृष्टीनें प्रगति करतांना आपली सहकार्य करण्याची तंत्रें, आणि विशेष महत्त्वाचें म्हणजे, विचारविनिमय करण्याच्या सवयी, यांचा विकास आपण करीत आहोत कृतीच्या ऐवजी करावयाची गोष्ट म्हणून नव्हे, तर संयुक्त कृती करण्याच्या दृष्टीनें आवश्यक गोष्ट म्हणून, पूर्वमसलतींचें असलेलें मूल्य आपण आतां शिकत आहोत

मात्र मसलती म्हणजे आधींच घेतलेल्या निर्णयाच्या अमलबजावणीसाठीं लागणाऱ्या जबाबदारींत भाग घेण्याची निव्वळ संधि नव्हे, हें काहीं सांगायला नकोच मसलती म्हणजे कल्पनांच्या आदानप्रदानांत, त्यांच्या साधकबाधकतेच्या मूल्य मापनांत, आणि अत्युच्च प्रमाणांत, सर्वसाधारण एकवाक्यतेच्या पायावर आधारण्यात यावयाच्या धोरणाची आखणी करण्यात सहभागी होण्याची संधि होय विविध हितसंबंधांत सुसंवादित्व निर्माण करण्याची ही एक पद्धति आहे ही कार्यपद्धति म्हणजे, आपण ज्या महान आंतर्राष्ट्रीय समाजाचे घटक असतो त्याची एकता अधिकतर सुसंघटित व्हावी, आणि खरा किमानपक्षीं सुद्धां तिला धक्का न लागावा, हा हेतू मनांत ठेवून ते हितसंबंध शक्यतोंवर एकमेकांशी जुळवून घेण्यासाठीं कोणत्याहि संघटनेनें योजलेले उपाय होत

आमच्या ॲटलांटिक राष्ट्रांच्या संयोगी संघटनेच्या सदस्य राष्ट्रांच्याप्रमाणें, प्रभाव आणि सामर्थ्य यांची विविधता असलेल्या सार्वभौम राष्ट्रांच्यामध्यें असणारी ती व्यवस्था आदर्श सुद्धां वाटण्याचा संभव आहे. खरोखरच ती आदर्श व्यवस्था असते, परंतु ती अस्तित्वांत यायला काहीं कालावधि लागेल. आणीबाणीच्या काळीं, किंवा गंभीर संकटाच्या समयीं, किंवा युद्धप्रसंगीं काहीं कमी प्रतीच्या भासणाऱ्या अगर तात्पुरत्या कमी दर्जाच्या व्यवस्थेवर

निमडून घ्यावें लागेल सकटग्रस्त आणि नस्त करून सोडणाऱ्या ज्या आतर्राष्ट्रीय धोक्याच्या परिस्थितीत दीर्घकालपर्यंत राहण्याचा आपल्यावर प्रसग आलेला आहे तिला तोंड देण्यास पुरेसें सरोल आणि सामर्थ्यशील ऐक्य आमच्या किल्येक लोकशाही राष्ट्रात घडवून आणण्यासाठीं –आणि स्वतत्र लोकसमूहाच्या सयोगी सघटना सुदृढ करण्यासाठीं,–सरतेशेवटीं सपूर्ण सल्ला मसल्ती घडवून आणण्याची आवश्यकता, आणि त्याच्यासाठीं यत्रणा निर्माण करून ती कार्यक्षम करण्याची आवश्यकता, मान्य करणें हाच एकमेव तरणोपाय आहे

ही विशाल जबाबदारी घेतली कीं, मग स्वत च्या आपल्या राष्ट्राच्या बाब तीत प्रत्येक लोकशाही सरकारनें प्रत्यक्षपणें घेतलेली घटनात्मक जबाबदारी सपते किंवा कमी होते, असें मात्र मुतराम नव्हें ही जबाबदारी काहींशी जादा आहे ही जबाबदारी म्हणज सर्वस्वी सरकारा-सरकाराच्यामधील करण्यात आल्ले नुसते औपचारिक करार असत नसते, तर ती माणसा–माणसांत अवश्यमेव विकसित होण्याजोगी एक प्रवृत्ति असते, ज्यांच्या मताचा व स्फूर्तीचा परिपाक लोकमतात होत असतो, असे राजनीतिधुरधर, सपादक, शिक्षक, आणि व्यावसायिक यानीं विकास करण्याजोग्य असा तो एक सद्भाव असतो

आता अशा मसलतीसाठीं प्रत्येक सरकार दुसऱ्याच्या राजधानीत जी परराष्ट्रीय सल्लागार शिष्टमडळें ठेवीत असतें, त्यांच्या व्यतिरिक्त उत्तर अॅटलांटिक कौन्सिलसारख्या खास सस्थेचा उपयोग होत असतो या कौन्सि लच्या कायम प्रतिनिधींच्या मार्फत होणारें कार्य प्रोत्साहन देणारें आणि भरीव मोलाचें असून, त्याचा विकास आणि विस्तार करणें योग्य होईल नाटो सघटनेच सदस्य असलेल्या राष्ट्रांच्या ' मुदती मत्रीपरिषदाना ' त्या राष्ट्रांचे परराष्ट्रमत्री हजर राहतात, कधीं कधीं तर त्या राष्ट्रांचे सरक्षण आणि अर्थ मत्री सुद्धां अशा परिषदांमध्यें भाग घेत असतात या परिषदातून अधिक निकट समस्या पुढें ठेवण्यात येतात बहुत करून या दर्जाच्या परिषदा फार तर दिवस दोन दिवस चालतात, आणि त्यात ठराविक भाषणें करण्यात व एखाद्या पत्रकाचा मसुदा तयार करण्यात

बराचसा वेळ जातो. अशा परिषदांतून मंत्र्यांचें भाग घेणें, हें एका अर्थी एखाद्या बड्या वार्ताहरासारखें प्रतिबंधक रेषे पुरतेंच ठरतें, आणि एखाद्या निर्णयासंबंधीं मसुद्यातली भाषा सुस्पष्ट व समर्पक असण्याच्या आवश्यकतेला दुय्यम स्थान देऊन, हजारो मैल अंतरावर असलेल्या स्वदेशांत दुसऱ्या दिवशीं निश्चित केलेल्या कार्यक्रमाला वेळेवर हजर राहण्यासाठीं दोन तासांत विमानतळ गाठण्याविषयीं ते मंत्री चिंतातुर झालेले असतात या अशा घाईंचा परिणाम गैरसमज होण्यात झाल्याची उदाहरणें गेल्या कांहीं वर्षांत बरेच वेळा घडलेलीं आहेत परिषदेत भाग घेणारे जर यापेक्षां अधिक दक्षता आणि अधिक श्रम चर्चा करताना घेते, आणि त्या कामीं अधिक वेळ देते, आणि एकवाक्यता झालेल्या, ततोतत घेण्यात आलेल्या निर्णयाचा किंवा तसे ते घेण्यात आले, असे समजून, त्याच्या संबंधीचे मान्य मसुदे व कागद पत्र बघण्याचे कष्ट घेते, तर बरेचसे गैरसमज टाळता आले असते.

तथापि, सल्लामसलत अगर विचारविनिमय म्हणजे केवळ ध्येयाचें एक साधन होय तें ध्येय कोणतें ?

आज तरी तें ध्येय आपली मानवी संस्कृति सरंक्षण करण्याचें, नव्हे शक्य-तोंवर आपलें अस्तित्व कायम राखण्याचें आहे संकटकालीं बहुतांशीं हें संपूर्णपणें मोठ्या सयोगी संघटनेवर सखोल निष्ठा ठेवण्यावर, आणि त्याच्याशीं तादात्म्य पावण्याच्या लोकांच्या भावनेवर, अवलंबून असतें विशेषत: जे प्रदेश तावडतोब संकटाचे सावलीत येतील, अशा महत्वाच्या क्षेत्रांतील लोक सल्ली आणि खास करून तेथील सरकारें बनविणारी माणसें यांच्या निष्ठा व तादात्म्य, यांचें प्रमाण जितकें असेल, तितक्या प्रमाणात तसें अवलंबून राहता येईल. युरोपमधील बहुतेक स्वतंत्र राष्ट्रांचीं सरकारें आणि जनता यांच्या वर १९३९ आणि १९४० मध्यें शरणागति किंवा कसलीहि तात्कालिक जरब दाखविली तरी, वाटेल ती अपेष्टा सोसून, स्वातंत्र्याच्या पक्षाला खंबीरपणानें चिकटून राहणें, यापैकीं एकाची निवड करण्याचा जो दुर्धर प्रसंग ओढवला होता, तसा प्रसंग, पुन्हा कधींहि कोणत्याहि राष्ट्रावर किंवा सरकारावर ओढवू नये, अशी आशा आपण करायलाच हवी परंतु आपण जरी असे बिकट कसोटीचे प्रसंग पुन्हां ओढवूं नये, अशी आशा करूं, तरी सुद्धा ते आलेच तर त्यांना टाळणें किंवा त्यांच्यावर मात करणें, हें कांहीं केवळ कोणत्याहि वैयक्तिक राष्ट्रांचें

सामर्थ्य किंवा निर्धार यांच्यावर अवलंबून राहणार नाहीं, तर ज्या प्रमाणात स्वतंत्र जनतेच्या संयोगी संघटनेतील नेते आणि जनता यांची अविचल निष्ठा विकास पावेल, त्या प्रमाणांत तिच्यावर तें अवलंबून राहील.

अशा प्रकारची निष्ठा–अशी आत्मीयतेची जाणीव निर्माण होण्यासाठीं नुसते मैत्रीचे लष्करी करारच उपयोगी पडत नसून, त्याच्यापेक्षा कांहीतरी अधिक भावना विकसित होण्याची आवश्यकता असते. आज नाटोच्या अंतर्गत, त्याच्या कक्षेत सामील असलेल्या प्रदेशांसाठीं सामुदायिक आणि समान सहकार्याच्या संरक्षक व्यवस्था अमलांत आणण्याचें लष्करी धोरण असून, त्या व्यवस्था अधिकाधिक बळकट आणि परिणामकारक होत आहेत. तरी सुद्धां हें सर्वसाधारण संरक्षक धोरण, समान परराष्ट्रीय धोरणाची नुसती अभिव्यक्ति न होतां, त्याला पूरक अशी आर्थिक व सामाजिक क्षेत्रामधील धोरणें देखील असणें, कालांतरानें आवश्यक ठरूं शकेल.

आपली संयोगी संघटना, किंवा आपलें सहकार्यसुद्धां, जर मजबूत आणि टिकाऊ करावयाचें असेल, तर या गोष्टी अशा कटाक्षानें वेगवेगळ्या राखून ठेवतां येणार नाहींत. याचें उदाहरण आज असलेल्या अमेरिकेच्या व कॅनडाच्या संबंधावरून देतां येईल.

सोपी राजकीय पद्धति म्हणून लोकशाही प्रचलित करणें, कधींच शक्य झालें नाहीं ती नागरिकांच्याकडून आणि विशेषतः राजकीय पुरुषांकडून फार मोठ्या अपेक्षा करीत असते. जसजशी तिची आंतरराष्ट्रीय कार्यसंस्था विस्तार पावते, तसतशा तिच्या अपेक्षा अधिक सापेक्षतेने वाढूं लागतात. मात्र संघटनेच्या काळांत या विशाल कार्यक्षेत्रावर भर देण्यास लोकशाही तुल्यबल असते कीं नाहीं, याची खात्री अद्यापिच देतां येत नाहीं. तिला तसें करतां येणें शक्य आहे, अशी माझी स्वतःची भावना आहे. ही माझी भावना, स्वतंत्र जगांत स्वातंत्र्याचें अविरत सुरक्षित राखण्यासाठीं लागणारें अत्यंत मोठें स्वार्थत्याग मान्य करण्याची आणि नव्या प्रसंगांना तोंड देण्याची योग्यता असणाऱ्या लोकशाही राष्ट्रांमधील नेते व जनता यांच्या सामर्थ्यावरील माझ्या ठाम विश्वासाच्या पोटीं जन्माला आलेली आहे.

## ४ : प्रकट राजनीति : प्रकाशातल्या वाटाघाटी

पहिल्या विश्वयुद्धाच्या ऐन भरात–"उघडपणानें होणारे उघड करार मदार" अशी घोषणा राष्ट्राध्यक्ष विल्सन यांनी केली त्यांची घोषणा निदान अर्धसत्य तरी होतीच, कारण लोकांनां धोरणाच्या गोष्टीसंबंधीं माहिती न सांगता, त्यांना त्यांत गुंतवून जुंपणें, हें दुष्टपणाचें आणि दूषणास्पद असतें

मात्र बाहीर झालेल्या आणि लोकांची संमति मिळालेल्या धोरणांची अमलबजावणी करण्यासाठीं, तांत्रिक स्वरूपाचे गुप्त करार करणें अर्थातच न्याय्य आणि योग्य आहे उदाहरणार्थ, या भू–खंडाच्या संरक्षणासाठीं माझ्या देशातील उत्तर भागात अमेरिका आणि कॅनडा यांच्या सहकार्यानें आधीं सूचना देऊ शकणाऱ्या किरणोत्सर्गी पटलांच्या विकासाची योजना कार्यान्वित होत आहे आपल्या दोन्हीं देशांनीं या कार्यांत घ्यावयाचा भाग आणि खर्चाचा भार, यांच्या संबंधी मागणींचीं सर्व साधारण तत्त्वें आणि सह–कार्यासंबंधीची वस्तुस्थिति, याविषयींची माहिती लोकांना करून देणें, हें अगदीं उचित आणि विहीत आहे परंतु त्याच्या संबंधीची तांत्रिक व्यवस्था बसविलेल्या यंत्राच्या जागा त्याच्या मारगिरीचे पल्ले आणि इतर कार्यक्षमता यांची माहिती देणें, मात्र अनुचित आणि अयोग्य आहे उघड करारांच्या तत्त्वाला अपवाद म्हणून या उदाहरणाचा उल्लेख मी करीत नाहीं, तर त्याचा निर्देश करण्यासाठींच असें करीत आहे

तथापि, राष्ट्राध्यक्ष विल्सन यांना अभिप्रेत असलेले उघडपणानें होणारे उघड करारमदार, ही वेगळीच बाब असून तिचे वचन अत्यंत संशयास्पद असतें "सर हॅराल्ड निकोल्सन यांनीं आपल्या "मुत्सद्देगिरीच्या पद्धतीचा विकास' या चिमुकल्या परंतु शहाण्या ग्रंथात, या शतकातील प्रारंभीच्या कालखंडातला फ्रेंच मुत्सद्दी ज्युल्स कॅम्बोन याचे पुढील उद्गार स्पष्ट स्पष्टपणें नमूद केले आहेत, 'ज्या दिवशीं गोप्य नष्ट होईल, त्या दिवशीं कोणत्याहि प्रकारच्या वाटाघाटी अशक्य प्राय होतील ' हें विधान कदाचित अति धाष्टें असेल परंतु उघड राजकारणाच्या व्यावहारांशीं थोडाफार संबंध असणारी व्यक्ति या नात्यानें मला खात्रीनें त्याचा प्रभाव जाणवतो

आपण पाश्चात्य लोक ज्याला 'इभ्रत' म्हणतो त्याच्याशीं अति चिंताकाम्य ठेवणं हें पौर्वात्य स्वभावाचें लक्षण मानून आपण स्वतः बद्दल फुशारक्या

मारतो. परंतु लोकशाही सरकारांना आणि ज्यांना वेळोवेळी निवडणूका जिंकायच्या असतात अशा राजकीय नेत्यांना वैयक्तिकरित्या या "इभ्रतीचें",— जिला आम्हीं प्रतिष्ठा म्हणतो, तिचें महत्त्व उपेक्षून चालता येत नाहीं, आणि त्याप्रमाणें कधींकधीं अतिरेकानें तिला आम्हीं डोक्यावर घेत असतो. परंतु कधींकाळीं लोकशाही मधील प्रत्येकजण इतका प्रगल्भ, इतका सुज्ञ आणि इतका सहिष्णु होईल कीं, त्याला दर्शनी भागाआड दडलेले संपूर्ण सत्य अचूक ओळखता येईल आणि केवळ सत्याचीच ते पर्वा करतील, परंतु तो सुदिन उगवायला अजून अवकाश आहे; तसें जर घडलें असतें तर सौंदर्य प्रसाधक उटणीं तयार करणारे कारखानदार आणि जनता संबंध तज्ज्ञाधिकारी यांना इतकें कामच उरतें ना!

दरम्यानच्या काळांत, जर मुत्सद्दी प्रतिनिधी मंडळाला करारनामे घडवून आणण्याच्या दृष्टीनें डावपेंचाचे स्वातंत्र्य देण्यात आलें, जर "इभ्रत" तिच्या अनुरूप मार्गी वळविण्यांत आली, तर मग पडद्यामागील वाटाघाटीच, पडद्यापुढील वाटाघाटींपेक्षा नेहमीं अधिक चांगल्या प्रकारें श्रेयस्कर ठरतील.

आंतर्राष्ट्रीय परिषदेसाठी जाणाऱ्या एखाद्या राष्ट्राच्या प्रतिनिधींना जर कडक सूचना देऊन त्यांची आगाऊच बाहेर प्रसिद्धी केली, तर त्याच्या-मुळेंहि मोठी गंभीर अडचण निर्माण होऊं शकेल. परिषदेच्या प्रारंभीच मोटाल्या जाड मथळ्याखाली तुमचें धोरण सगळजाहिर झाल्यानंतर, त्यांतल्या कांहीं थोड्या गोष्टी वगळणें देखील मोठें बिकट तर होऊं शकतें. एखाद्यानें सर्वकाळ पुरस्कारिलेलें धोरण अत्यंत शहाणपणाचें आहे, असें आधीं आकाशवाणीच्या आणि वृत्तसंस्थांच्या "पंडितां"नीं मान्य केल्यावर, मग तें जर पडलेलें दिसून आलें, तर नंतर त्याच्यामुळें संतापलेल्या "पंडितांच्या" क्रोधाला तोंड देण्याइतकी दुसरी बिकट गोष्ट क्वचितच असते.

"उघड" मुत्सद्देगिरीला अडचणींत आणणाऱ्या अनेक गोष्टीपैकीं एक म्हणजे, मारून मुटकून तीन तर करण्यात आलेल्या लोकमतामुळें वाटाघाटींच्या नुसत्या स्वरुपातच नव्हें तर प्रत्यक्ष कार्यांतच गोंधळ निर्माण होण्याची शक्यता होय.

वाटाघाटीचा हेतु दिलसंबंधांत एक शक्यता घडवून आणण्यासाठीं कांहीं तरी समान भूमिका, सडतोटीची कांहीं शक्यता, शोधून काढण्याचा प्रयत्न विशिष्ट

परिस्थितीमध्ये करण्याचा, आणि देवाण घेवाण पद्धतीनें उभय पक्षाना संमत असलेला मार्ग धुंडाळण्याची धडपड करण्याचा असतो. परंतु जेव्हा वाटाघाटीच्या प्रसंगीं दिलेली एखादी सवलत, किंवा केलेली तडजोड, जर करारामधली एखादी शर्त म्हणून स्वदेशात त्याच घटकेला बातमीच्या किंवा एखाद्या व्यंगचित्राच्या मुद्रित स्वरूपात किंवा आकाशवाणीवरून जाहीर होण्याची भीति वाटाघाटी करणाराना वाटूं लागली, तर अशी देवाण घेवाण करून जुळतें घेणें मुष्कर होणार नाहीं, आणि प्रसंगीं अशक्य देखील होईल.

एका शतका आधीचा एक फर्डा मुत्सद्दी डि कॅलिगरे या बाबतीत लिहिताना आम्हाला थोडासा सदुपदेश करून गेला :

> " सर्वंधित पक्षाच्या खऱ्या हितसंबंधामध्यें सुसंवादित्व निर्माण करणें हेंच वाटाघाटीचें रहस्य आहे," " दडपशाही नेहमी वाटाघाटीला विघातक ठरतात कारण त्या एखाद्या पक्षाला दुसऱ्या टोकापर्यंत ताणून धरायला प्रवृत्त करीत असतात, आणि त्या तसें करतात याचें कारण त्याना चिथावणी मिळालेली असते. मनुष्याचा अहंकार दुखावला म्हणजे तो त्याला अशा मार्गांकडे पिटाळून नेत असतो, कीं ते मार्ग त्यानें स्वहिताच्या दृष्टीनें त्याची चित्तवृत्ति थाऱ्यावर असती, तर टाळलें असते. ही प्रवृत्ति सर्वश्रुत आहे. बळजबरी किंवा फसवणूक यांच्या योगानें मिळविलेल्या यशाचा पाया नेहमींच डळमळीत व असुरक्षित असा असतो. याच्या उलट परस्पर हितसंबंधाच्या पायावर स्थित झालेलें यश पुन्हा आणखी आगामी यशाची मुद्दां हमी देत असतें."

तथापि, वाटाघाटीचें कार्य, विरोधी हितसंबंधाचा समेट घडवून आणण्याचें असतें, हें जर खरें असेल, तर आंतर्राष्ट्रीय जीवनात देखील, निरनिराळया राष्ट्रांचे हितसंबंध एकमेकाना निकराचा विरोध करणारे असतात, ही सुद्धा दुराग्रही वस्तुस्थिति आहे या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष्य करणारे किंवा दुसऱ्या टोंकाला जाऊन, धोरणाविषयींचे मतभेद स्पष्ट करण्याचा प्रयत्न करताना एक बाजू संपूर्णपणें शुभ्रधवल आणि दुसरी बाजू सगळीच काळीकुट्ट रंगविणारे, एका अवास्तविक मिथ्या जगतात राहत असले पाहिजेत. अशा मनुष्याचें, मिथ्या विश्वास आणि बागुलबोवा यांच्या आधारावर, ज्या प्रमाणात धोरण

निश्चीत करण्यांत येते, त्या प्रमाणांत त्याचा परिणाम अनर्थकारक होण्याचा संभव असतो. आम्हांवर आज कोसळणाऱ्या अनर्थापैकीं हीहि एक आपत्ति आहे, याबद्दल मुळी संशयच घ्यायला नको. हिच्यामुळें आणखीसुद्धां एक अनर्थ ओढवतो. वाटाघाटीचें प्रमुख कार्य म्हणजे प्रतिपक्षाच्या मनाची समजूत घालणें. श्री. जार्ज केनान यांनी एकदां याला अनुलक्षून "जवळ जवळ नष्टप्राय झालेली मुत्सद्दीपणाची कला" असें म्हटलें होतें, त्या कार्यांत यामुळें अडथळा आणि वैफल्य निर्माण होत असतें.

एखाद्या गंभीर वाटाघाटीत जर तुम्हीं समाधानकारक आणि सन्मान्य तडजोड शोधून काढण्यांत यश मिळविलें असेल, तर त्यांत तुम्हीं शरणागति पत्करलेली नसते; तो तुमचा विजय असतो. तुमचा प्रतिपक्षी जरी तुमचा संभाव्य शत्रु असला तरी, तुम्हीं स्वाभिमान आणि महत्त्वाचें हितसंबंध यांच्या बाबतींत जर आपलें इमान शाबूत राखलें, तर असेंच यश तुम्हीं मिळवूं शकाल. तुम्हीं केलेल्या कराराची मान्यता म्हणजे, एका अर्थी, तुमचा हेतु शत्रुत्वाचें परिवर्तन सहिष्णुत्वाच्या भावनेत करण्याचा आहे, व पुढें त्यांतूनच प्रसंगीं सहकार्य निर्माण होण्याची आशा तुम्हांला वाटते, याची कबूलीच असते.

संभाव्य शत्रूंच्या बरोबर वाटाघाटी करीत असतांना आपण एका गोष्टीची जाणीव ठेवणें अगत्याचें आहे, ती म्हणजे, या बिकट आणि भयग्रस्त जागतिक परिस्थितीत, जाणून बुजून करण्यांत येणाऱ्या आक्रमणाच्या संकटाप्रमाणेंच, आकस्मिकरणें युद्ध पेटण्याचा देखील धोका असतो, ही होय. कोणालाच्हुदां नको असणारें युद्ध, एका पक्षाला दुसऱ्या पक्षाच्या उद्देशांविषयीं वाटणाऱ्या गैर-समजुती, किंवा गैर हिशोबी अंदाज, किंवा गैर कल्पना यांच्यामुळें, कोणाच्या ध्यानीं मनीं नसतांना सुद्धां, एकाएकीं ओढवतें. एखादी कोणतीहि विशिष्ट बाजू खरी असो, किंवा खोटी असो, अशा चुकीचा परिणाम, आज आधुनिक अवस्त्राच्या मध्यें, संपूर्ण जगाला घातक आणि धोक्याचा ठरण्याची शक्यता असते. याच कारणासाठीं, आंतर्राष्ट्रीय तणातणी कमी करणें, तापलेलें वातावरण खालच्या पाऱ्यावर आणणें, आणि मानसिक व शारीरिक दळणवळणांचीं कुंपणें काढून टाकणें, याच्यासंबंधीं उपाय योजना करण्याकडे अत्यंत अगत्यपूर्वक लक्ष दिलें पाहिजे.

माझें तर असें मत आहे, कीं या विभागलेल्या जगात मनुष्याच्या योग्यतेला

राज्यसत्ता, किंवा वंश, किंवा आर्थिक अवस्था, यांचे असणारे कोणतेहि भेदाभेद उल्लंघून, आणि कोणत्याहि प्रकारचे भय किंवा दुराग्रह यांचे किंवा अन्य पोलादी पडदे फाडून, पलीकडच्या मनुष्याबरोबर दळणवळण ठेवण्यात संपूर्ण आणि अंतिम अपयश येण्याइतकी अन्य कोणतीहि गोष्ट अधिक सकष्टप्रद नसावी माझ्या तरी दृष्टीनें, आमच्या अत्यंत महत्त्वाच्या मुत्सद्दीपणाचा हेतु हे दळणवळणाचे मार्ग मुक्त आणि विकसित करण्याचा असावा, म्हणजे कधीं काळीं जेव्हा उभय पक्ष वाटाघाटी करण्यास आणि फलत करार करण्यास खुषीनें उद्युक्त होतील, तेव्हां ते मार्ग त्या कार्याच्या वेळीं उपयुक्त ठरतील

अडीचशें वर्षांपूर्वी चौदावा लुई म्हणाला होता —

'उघड वाटाघाटी, वाटाघाटी करणाराना गैर वाजवी दुराग्रही वृत्तीनें आपली स्वत ची इभ्रत बचावण्याकडे, आणि आपल्या सार्वभौम सत्ता धीशाची प्रतिष्ठा, हितसंबंध, आणि युक्तिवादाचे मुद्द कायम प्रस्थापित राखण्याकडे, आणि प्रसंगोपात वारंवार उपस्थित होणाऱ्या श्रेष्ठ प्रतीच्या युक्तिवादापुढें नमतें घेण्यास प्रतिबंध करण्याकडें, प्रवृत्त करीत असतात ''

अठराव्या शतकातले सद्दहू सत्ताधीश हीं सर्व साधारणत व्यक्तिगत माणसें होतीं आज त्या सत्ताधीशाच्या जागीं कायदेमंडळांचे शतावधि सभासद, वर्तमानपत्राचे लक्षावधि वाचक, आकाशवाणीचे श्रोते किंवा टेलिव्हिजन ( दूरदर्शन ) वरील प्रेक्षक आहेत मुख्यत हे आमचे सत्ताधीश मतदार असून, त्यांच्यावर ज्यांनी त्यांची मतें हवीं असतात, त्यांच्या प्रत्येक प्रकारच्या सामुदायिक आवेदनाचा आणि सामुदायिक खुष मस्करीचा वर्षाव होत असतो अशा परिस्थितींत उघड वाटाघाटीमुळें प्रोत्साहित झालेली संकीर्णता संपूर्णपणें ताठर होण्याइतकी कठीण बनत असते

तथापि, आजच्या दुबळ्या मुत्सद्याला किंवा राजकीय वाटाघाटी करणाराला एका गोष्टीनें धीर बांधायला पाहिजे कीं १९५५ मध्यें लोकमत फक्त त्याच्या कृतिस्वातंत्र्यावरच बंधन आणीत असतें; परंतु चौदाव्या लुईच्या लहरीनुसार कृति स्वातंत्र्यापक्षांदेखील अधिक स्वातंत्र्याला तो मुकू शकला असता आणि अपयश आलें तर लोकमताच्या दाबाशीं जुळते घेण्यासाठीं करावयाच्या फेरफारामुळें त्याला आपली नोकरी किंवा निवडणूक गमावण्याचा धोका

परकरावा लागेल, परंतु पूर्वीच्या काळीं अशा अपयशाबद्दल होणारी शिक्षा बहुतेक गळ्याभोंवती प्राणघातक फास आणण्याचीच असे म्हणजे यालाच प्रगति असें आतां म्हणण्यात येतें।

आधुनिक जगातला, जरी अत्यंत अगत्याचा व अवश्यमेव भाग नसला, तरी परराष्ट्रीय मुत्सद्देगिरीच्या वाटाघाटींचा अत्यंत गाजावाजा करण्यात आलेला भाग, म्हणजे विवक्षीत राजकीय हेतूसाठीं खास 'अॅड् हॉक्' परिषदा बोलावण्याची टूम होय हें तत्त्व नवें नव्हतें तरी, आजकाल, पूर्वीच्या पिढीपेक्षा अधिक जास्त प्रमाणात उपयोगांत आणण्यात येत असतें असत, याचें एक कारण म्हणजे या वाटाघाटींचें स्वरूप आतांपर फक्त उभय बाजूच्या पुरतें उरलेलें नसून, त्याला आतां अनेक वाटाघाटी फाटे फुटत असतात, व आमच्या अनेक आधुनिक समस्या सोडविण्यासाठीं अशा परिषदांची गरज भासत असते माझ्यामतें ही एक अत्यंत महत्त्वाची प्रगति आहे मात्र नुकत्याच संपलेल्या युद्धोत्तर दशकाच्या इतिहासानें दर्शविल्या प्रमाणें, ही प्रगति बिकट अडचणी आणि मनोवैकल्य यांच्याकडे नेऊ शकणारी आहे

प्रत्येकाचें वेगवेगळे दृष्टिकोन आणि वेगवेगळे हितसंबंध असलेल्या, व अनेक निरनिराळ्या देशांतून येणाऱ्या, परंतु सर्वांनाच एक वाक्यता निर्माण करण्यासाठीं काहीं तरी मार्ग शोधून काढण्याची उत्सुकता असणाऱ्या, मुत्सद्यांना सल्लयावें करण्यासाठीं एकत्र जमण्याचा प्रसंग, म्हणून अशी खास परिषद राजकीय मुत्सद्देगिरीच्या क्षेत्रांत बहुमोलाची आणि प्रभावी भूमिका बजावू शकते तथापि, या बाबतींत एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे अशा प्रकारच्या एकाच परिषदेनें यशस्वी फलश्रुति पदरात पडत नसते, तर तिच्या साठीं परिषदे पाठीं परिषद अशी परंपरा सुरू करावी लागते प्रत्येक परिषद काहीं दिवस चालणारी असते, आणि ती संपली म्हणजे परस्पराच्या दृष्टि-कोणाबद्दल मुत्सद्दीपणाच्या मार्गांनीं विचारविनिमय करण्यात येतो, आणि अशा पद्धतीनें यश मिळण्याच्यापूर्वी, बरेच महिने किंवा वर्षे सुद्धा लोटतात

या अशा परिषदांच्या यशाच्या अटी म्हणजे, विविध हितसंबंधांची चुरस न चालविता सर्व संमत सामान्य हितसंबंध सर्वश्रेष्ठ मानणे, आणि हितप्रद परिणाम व्हावेत म्हणून सर्व सामान्य इच्छेची कास धरणें, या होत हे असें यश

प्राप्त होण्यासाठी मंत्र्यांनी आणि अधिकाऱ्यांनी अत्यंत दक्षतापूर्वक, दीर्घ काल, निरपवादपणे, आणि बहुधी अत्यंत गुप्तपणानेंसुद्धा, पूर्व तयारी करणें, अत्यंत आवश्यक असतें

अशा नाट्यपूर्ण, संदेही आणि बुजऱ्या मन स्थितीच्या वातावरणात खूप गाजावाजा करून, अपुऱ्या तयारीनें भरविलेल्या परिषदा, त्यांच्या परिणामापेक्षा त्या लोकांच्या नजरेत भरण्यासाठीच असतात हें सगळें तत्र जरा निराळेंच असतें

तथापि, काहीं प्रसंग असे येतात आणि कधीं कधीं तें अत्यंत बिकट आणि अत्यंत महत्त्वाचे असतात,—कीं तेव्हा अशा अत्यंत गाजावाजा झालेल्या परिषदा वाटाघाटीचे कोणतेहि मार्ग सुचविण्याच्या दृष्टीनें अगदीच तुच्छ कामाच्या ठरतात तेव्हा सर्व जगातले प्रकाशझोत केवळ एकाच ' शिखरावरील वाटाघाटी " वर केंद्रित केलेले असतात ते व्हा अपरिहार्यतेनें नाट्यमय वातावरण निर्माण होतें असें वातावरण हें जनतातथच अधिकाऱ्याचें स्वप्न असू शकेल, परंतु तें मुत्सद्यानें समाधिस्थळ होईल ज्यावेळी लोकांच्या अपेक्षा आणि प्रक्षोभ मर्यादारेषेकानें उत्तेजीत होत असतात तेव्हां मसलतीचा मद बुद्धीशी आणि तडजोडीचा सरातें शरणागतीशी गोंधळ करण्याकडे प्रवृत्ति होत असते

मुत्सद्दी लोकाना आपण राजनीतीच्या बाबतीत अधिक मोकळीक दर्णे हें अधिक बरें अशी सूज्ञ मला का वाटावी वाटते, याचें एक कारण हें आहे मुत्सद्यानां आपल्या कामाचें योग्य शिक्षण मिळालेलें असतें आणि सामान्यत प्रत्येक डाव सपला कीं त्याचा परिणाम जगजाहीर केल्यावाचून एखादी वाटाघाट सुरू ठेवण्यात त्यांना सौख्य वाटत असतें

जेव्हां अधिकृत मुत्सद्दीपणाच्या मार्गानीं एकवाक्यता संपादन करण्यात सरकारांना अपयश येतें, तेव्हां त्यानीं आणखी प्रयत्न करून पाहाणें शक्य असतें, किंवा निदान त्यांनीं सतापून न जातां अपयश तरी सहन करावें

परंतु जेव्हां परराष्ट्र मंत्री किंवा त्याच्यापेक्षाहेतील अधिक श्रेष्ठ, म्हणजे सरकारांचे प्रमुख एकत्र येतात तेव्हा त्यांचा लवाजमा खूपच अवाढव्य असतो त्यांच्याबरोबर अपरिहार्यपणें खूप संख्या आकाशवाणी व दूरदर्शन

मंडळाचे काफिले असतात, तज्ञ व सल्लागार, आणि त्या सल्लागारांना सल्ला देणारे सहाय्यक असतात त्यांच्याबरोबर पाठीमागे राहून प्रसंगाच्या देखाव्या-मागील कार्यचतुर पुरुष, आणि त्याच्याहिपेक्षा अधिक कार्यचतुर, व प्रत्यक्ष तो प्रसंगाचा देखावा निर्माण करणारे पुरुष असतात, या सर्व लव्याजम्यामुळे गोष्टींत बिघाड होऊन,त्यांच्यात गोंधळ आणि अडचणी निर्माण होऊ लागतात

अशा परिस्थितीत नेहमीं एक धोका असतो ज्या परिषदावर लोकांच्या इतक्या आशा अपेक्षा केंद्रीत झालेल्या असतात, त्यांच्यात जर काहीं एकवाक्यता होऊ शकली नाहीं, तर त्याचा अर्थ अपरिहार्यतेनें, आतां कधींहि एकवाक्यता होण्याची शक्यताही नाही, याचा तो सबळ पुरावा असण्याकडे करण्यात येईल ही अशी प्रतिक्रिया होणें अनावश्यक, निराशाजनक आणि पराभववादी वृत्तीचें द्योतक आहे परिणामत, तिच्यामुळें झालेले मतभेद लपवून ठेवण्याचा किंवा नाकारण्याचा, अथवा त्याचा दोष इतर व्यक्तीवर अगर अनेक व्यक्तींवर लादण्याचा अत्यंत प्रबळ मोह होऊ लागतो

याच कारणानें राजनैतिक वाटाघाटी करणाराऱ्या हातीं, त्याला स्वत चे अपयश समजावून सांगताना, किंवा निदान आपल्या अपूर्ण यशाचें स्पष्टीकरण देताना, "प्रांजळ आणि पूर्ण चर्चा" करून तींत "एकवाक्यतेच्या सर्व मुद्याची शहानिशा" केली आणि फलत "एका स्पष्ट विचारासबधीं सर्वांचें एकमत होऊ शकलें," असे बहुमूल्य शब्दप्रकार खेळणीं म्हणून सांपडलेलीं असतात

याच कारणामुळें कम्युनिस्ट सरकारें परिषदांच्यामधील आपल्या प्रचारात्मक युक्त्या प्रयुक्त्या आधींपासून, प्रत्यक्ष परिषदा भरण्याच्या फार पूर्वी, योजून ठेवीत असतात, आणि आपल्या अपयशाचासुद्धा गैरफायदा घेण्यासाठी त्याचा दोष परिषदा संपल्यावर बऱ्याच कालावधीनंतर दुसऱ्यावर लोटीत असतात.

---

# ५ : प्रगट राजनीति–संयुक्त राष्ट्रसंघ

आज सापेक्षत एक नव्या प्रकारची राजनीति अस्तित्वात आलेली आहे पण व्यवसायाची अनेक जुनीं कार्ये आणि तंत्रें जिनें हस्तगत केलीं असून, मी उल्लेखिलेल्या काहीं दुर्बलतामुळें ती भेद्य झालली आहे ज्या सार्वजनिक आंतरराष्ट्रीय मंडळामध्यें त्यांनीं स्वत ह्या राजनीतीचा खेळ चालवायचा असतो, त्या मंडळाच्या मधलें अत्यंत महत्त्वाचें मंडळ अर्थातच, संयुक्त राष्ट्र संघ होय तेथें चालणारी राजनीति मोठ्या चमत्कारिकपणें आणि कधीं कधीं अगदीं धादल उडवून देणाऱ्या पद्धतीनें वाहत असणाऱ्या प्रचाराच्या सर्व वाऱ्यांना मुक्तद्वार देते ती गैरसमजालसुद्धा, आणि परोपरच आपला दुरुपयोग करून घेण्याला सुद्धा, मुक्तद्वार देत असते

तथापि, या बाबतींत संयुक्त राष्ट्रसंघाला त्याच्या अपुरेपणामुळें दोष देणारे दोन गोष्टी विसरतात पहिली अशी कीं संयुक्त राष्ट्र संघात गंभीर आणि गुप्त सलवतें करता येणें शक्य असतें आणि तीं होतात सुद्धा ! असतात, आणि दुसरी म्हणजे, आमच्या या जागतिक संघटनेला केवळ अशा वाटाघाटींसाठी संधि आणि यंत्रणा प्राप्त करून देण्याच्या कार्यापेक्षा सुद्धा अधिक महत्त्वाची भूमिका करावी लागणार आहे

पहिल्या मुद्यासंबधीं, मी अनुभवावरून अशी ग्वाही देऊ शकतों, कीं या प्रकारचें विधायक राजनैतिक कार्य मॅनहॅटन मधल्या संयुक्त राष्ट्र संघाच्या इमारतींत आणि आसपास चालत असतें परंतु त्याची शक्यता सार्वजनिक परिषदा भरणाऱ्या प्रशस्त दालनांत मात्र कधींच नसते अशीं सलवतें मुकर होण्यासाठीं वापरण्यात येणाऱ्या सोयीच्या जागा म्हणजे प्रतिनिधींचें शिष्टमंडळांचें गप्पागृह, विविध कायम प्रतिनिधी मंडळांचीं कार्यालयें, आणि अधिकृत बैठकी चालू नसतेवेळीं, समित्यांच्या सभांसाठीं वापरण्यात येणारी ल्हानमोठीं सभागृहें, या होत पूर्वनदीच्या उद्यानातील वाटा आणि जवळ पासचीं विश्रांतिगृहें सुद्धां अशा यशस्वी वाटाघाटीचीं स्थळें बनलेलीं आहेत या कामीं कोणतेंहि स्थळ चालू शकेल, मात्र तें कान, डोळे, आणि फोटो घेण्याचा कॅमेरा यांच्या टप्प्यापलीकडील असायला पाहिजे नाहींतर त्यांच्या नाक खुपसण्याच्या प्रवृत्तीमुळें अशा प्रसंगीं वाटाघाटी जरी खरोखर फिसकटत नसल्या, तरी त्यांचा बट्ट्याबोळ होऊन त्या अधिक बिकट होत असतात

संयुक्त राष्ट्रसंघाला बदनाम करण्यात नेहमी दुर्लक्षित होत असलेल्या त्याच्या दुसऱ्या कार्याचा संबंध, आंतरराष्ट्रीय संघात त्यानें पार पाडावयाच्या मूलभूत भूमिकेशी असून, तिचें स्वरूप प्रतिनिधीक वैधानिकपणाचें (पार्लमेंटरी) असतें, असें वर्णन करता येईल

या पार्लमेंटरी भूमिकेमुळें, परंपरागत राजनैतिक तांत्रिकतेच्या सोबतीला संयुक्त संघाच्या प्रमाणें मुक्त व्यासपीठ असणाऱ्या राजनैतिक परिषदा चालू ठेवण्यास आणि त्यांचा उपयोग करण्यास सबळ कारण मिळत असतें त्याच्या आंतरराष्ट्रीय हितसंबंधातील स्पर्धा आणि संघर्ष अशी चर्चा आणि वादविवाद यांच्या निमित्तानें चव्हाट्यावर येत असतात, आणि गुप्त वाटाघाटीनें होणाऱ्या संभाव्य मनसमजावणीचा, व तीत यश आल्यास जाहीर करण्यालायक एकवाक्यतेच्या कराराचा पूर्वरंग म्हणून त्याचा उपयोग होत असतो तद्वतच, असेंच किंवा याहूनहि अधिक महत्त्वाचें म्हणजे, या भूमिकेमुळें आणखी सुद्धा एका गोष्टीला मान्यता मिळत असते ती गोष्ट, जगातील जनता आणि सरकारें याना, आपल्या विभिन्न आणि इर्ष्या असलेल्या हितसंबंधामध्यें एकमेकाचें मन वळवून, परस्पर संमतीनें मिलाफ आणि तडजोड करण्यासच नुसतें भाग पाडत नाहीं, तर त्याच्याच जोडीला सर्वांना एक समान असे हितसंबंध शोधून देते, व त्याचा सार्वत्रिक जाणीवपूर्वक परिचय करून देण्यास, आणि उघड चर्चा करून त्याचा अवलंब करण्यास, देखील भाग पाडीत असते कारण वाटाघाटी म्हणजे राजनैतिक मुत्सद्दीपणाचा अत्यंत आवश्यक भाग असला तरी, तो त्याचें एक अंग मात्र असतात

या मुद्याबद्दल समजूत पटली, म्हणजे संयुक्त राष्ट्रसंघावर सतत होत असलेल्या निराधार टीकाना प्रवृत्त करणाऱ्या, त्याच्या वास्तविक कार्याविषयी निर्माण झालेल्या गैरसमजाचें निराकरण होण्यास बरीच मदत होऊ शकेल संयुक्त राष्ट्र संघाचें खरें मूल्यमापन करताना प्रथम हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, कष्ट पेलून करण्यात यशाच्या राजनैतिक वाटाघाटीच्या ऐवजीं वापरण्यास यावयाचा पर्याय नसतो, तर तो राष्ट्रें आणि जनता यांचा एक समाज असल्याचें प्रतीक, आणि त्यांच्या परस्परावलंबनाच्या गुंतागुंतीबाबत कार्य करण्याचा एक प्रयत्न असून, त्याला मान्यता हाच त्याचा प्रारंभ बिंदु होय आज जरी हा जागतिक समाज अत्यंत मात्र पुसट आणि सत्त्व हीन असला, तरी तें ध्येय साकार करण्या

साठीं आपण सर्वांनीं झटलें पाहिजे संयुक्त राष्ट्रसंघ हा श्रेष्ठतम सत्याच्या अत्युत्तम प्रतीका प्रमाणें एखादी निर्जीव वस्तु, एखादें चिन्ह किंवा एखादा ध्वज नसून, एक सजीव आणि मानवी संस्था आहे. आणि त्यात माणसेंच आहेत सध्या जरी त्याचा बीजांकूर अवस्था, तरी पुढें त्याचा उचितच एका सत्याग्रही समाजांत प्रगति होण्याइतका विकास होण्याची शक्यता आहे संपूर्ण विनाश आणि संपूर्ण पददलितावस्था, याचा अपवाद सोडल्यास, आणखी याच्या व्यतिरिक्त विश्वैक्याच्या आपल्या ध्येयाकडे जाण्याचा एखादा अन्य मार्ग आहे काय ? आजच्या हैड्रोजन युगात सरते शेवटीं अशा पददलित जगाव्यतिरिक्त कोणतें अन्य प्रकारचें जग संभवणें शक्य आहे ?

टेनिसनचें "मानवतेचा दरबार" हें काव्य एक असून, त्यातील स्वप्नदर्शी कल्पना साकार करण्यासाठीं अनेक झटले कित्येकानी त्याच्यासाठीं आपले प्राण देखील दिले, आणि तेंच स्वप्न संयुक्त राष्ट्र संघाला प्रत्यक्षांत उतरावयाचें आहे आपण अजून सुद्धा ते स्वप्न साकार करण्यात अपेशी ठरू, परंतु तसें होऊं देता नये, परंतु संयुक्त राष्ट्रसंघाच्या मॅन हॅटन मधील पेंसे महालांत अजून तें स्वप्न साकार झालें नाहीं, म्हणून कुणालाहि त्या स्वप्नाचा अजिबात त्याग करण्याचा अधिकार कोणत्याहि परिस्थितींत, प्राप्त होत नाहीं.

संयुक्त राष्ट्रसंघ हा अजून बाल्यावस्थेंत असल्यामुळें, त्याच्यावर टीकाकारांनीं जरा कमी आग पाखडावी अशी विनंति त्याना त्याचे पक्षपाती वारंवार करीत असतात ते जर केवळ संघटनेच्या वयाचाच या विनंतीच्या संदर्भांत उल्लेख करीत असतील, तर मी त्याना सहानुभूति दाखवू शकत नाहीं या बाबीचा काळाशी मुळींच संबंध नाहीं ज्या प्रमाणात या नव्या युगात विश्वसमाजानी ही मागणी, आणि त्या ध्येयाबद्दलची निष्ठा, यांना लोकमताची मान्यता मिळेल, त्या प्रमाणांत संयुक्त राष्ट्र संघ दुबळा किंवा बलवान होऊ शकेल एरें महत्त्व मॅन हॅटनमधील या संस्थेच्या अनुभवाचें नाहीं, तर सर्व परिसीच्या ठायीं वसणाऱ्या स्त्री पुरुषाच्या आणि राष्ट्राच्या बौद्धिक व नैतिक प्रगल्भतेचें आहे

संयुक्त राष्ट्र संघानें अशा प्रकारें सजीव प्रतीक बनण्याच्या जोडीला, आपल्या सनदेमध्यें कांहीं तत्वें किंवा नैतिकतेचे नियम घालून दिलेले आहेत, आणि त्याचें पालन करण्याचें वचन संघाच्या सदस्य सरकारांनीं दिलेलें आहे

ही नियमावलि संपूर्ण निर्दोष नसली, तरी चांगली आहे. बहुतेक धार्मिक स्मृतींच्या प्रमाणें तिचें परिपालन काहीं अंशीं होतें, आणि तिच्या परिपालनापेक्षा, तिच्या नियमांच्या होणाऱ्या उल्लंघनाकडेच लक्ष देणें जरूर असतें.

त्याच्याहि पलीकडे जाऊन, सनदेनें काहीं प्रातिनिधीक संस्था प्रस्थापित केलेल्या आहेत. त्याना अन्य यंत्रणा संयोजित करण्याचा अधिकार आहे. त्यामुळें आपल्याला एक सजीव संघटना, एक—असीम नसली तरी महान शक्यता अपेक्षित असलेली—नवी सामाजिक व्यवस्था प्राप्त झालेली आहे. सनदेच्या मार्फत मनुष्याना न करता येण्याजोगी अशी गोष्ट राजकीय क्षेत्रात क्वचितच असेल; मात्र पुरेशा मनुष्यानीं ती करण्याचा संकल्प केला पाहिजे.

या प्रातिनिधीक संस्थांचें—जनरल असेंब्ली, ( सुरक्षा समिती ) सिक्युरिटी कौन्सिल, ट्रस्टीशिप कौन्सिल ( विश्वस्त मंडळ ) आणि "इकोसोक"—याचें स्वरूप दाम्याच्या बाबतींत राजनैतिक वाटाघाटी करणाऱ्या एखाद्या परिषदे पेक्षा एखाद्या पार्लमेंट बरोबर किंवा घटना परिषदेशीं अधिक जुळतें असतें. हें मी सुचविलें आहेच. राष्ट्राच्या पार्लमेंटाच्या प्रमाणेंच त्याचें बरेंचसें मूल्य, निःसंदिग्धपणानें, मताना चालना देण्याची, त्याच्यावर लक्ष केंद्रित करण्याची, आणि प्रमुख दृष्टिकोन बनवून, ते अभिव्यक्त करण्याची व त्याना नाट्यमय पद्धतीनें समोरासमोर उभें करण्याची त्याची जी योग्यता आहे, तिच्यावर अवलंबून आहे. काहीं प्रश्न चव्हाट्यावर आणून त्याच्या काळोखी भागावर प्रकाशाचे स्रोत सोडून आणि त्याना पूर्णतः उजेडात आणून, त्याच्या कारभाराशी संबंधित असलेल्या अंमलदारी व्यवस्थेला, अधिक दक्षता आणि जबाबदारी घेण्यास संयुक्त राष्ट्र संघ प्रोत्साहित करीत असतो. त्यामुळें एखाद्या चौकशीच्या चव्हाट्यावर ज्याची सार्वजनिक तपासणी झाली तर शरमेनें खाली मान घालण्याची पाळी येईल, अशी कृत्यें आपल्या हातून घडूं नयेत, या संबंधीं ते जाणून बुजून जागरूक असतात. हें असें करून संयुक्त राष्ट्र संघ सरकारांच्या कारभारात प्रगतीची प्रवृत्ति निर्माण करतो. या बाबतींत त्याचें कार्य एखाद्या स्वतंत्र, निर्भीड स्पष्टवक्त्या पार्लमेंटच्या किंवा कॉंग्रेसच्या कार्याशी समानता दर्शविणारें असतें.

राष्ट्रा मधील कायदे मंडळें राष्ट्रीय प्रश्नांचें शिक्षण रस्त्यातल्या माणसाला देण्याचें कार्य सुद्धा, त्याना सार्वजनिक वादविवादांचें नाट्यमय स्वरूप देऊन,

करीत असतात. या वादविवादांनी राष्ट्राच्या इतिहासामध्यें राष्ट्रीय हितसंबंधाविषयीची जागरूकता आणि राष्ट्रीय समाजाविषयीची जाणीव यांची वाढ करण्याची अमाप सेवा बजाविली आहे जनरल असेंब्ली किंवा संयुक्त राष्ट्र संघाच्या अन्य संघटना यांच्यामध्यें होणारे वादविवाद आपल्या परीनें जागतिक प्रमाणावर तशाच प्रकारची भूमिका बजावू शकतील, आणि त्याप्रमाणें त्यांनी प्रारंभ केला देतील

आणखी एक दुसरा मुद्दा आहे. सर हॅरोल्ड निकोल्सन ज्याना " ध्वनिक्षेपकावरील राजनीति " आणि " अवमानाची राजनीति " असें म्हणतात त्या, फक्त वाटाघाटीच्या संदर्भात सरोबरच त्यांनी महत्त्वाप्रमाणें " एक वस्तात्मक पदसो व्याघात " आहेत परंतु या सदा एखाद्या निकोप पार्लमेंट मधील जिवत आणि आवेशयुक्त वादविवादाच्या येळीं सुयोग्यपणानें सूचक ठरू शकणाऱ्या आहेत ही कधीहि न संपण्याजोगी प्रचारात्मक भाषणें, ज्याच्या बरोबर त्या प्रतिनिधीला वाटाघाटी करावयाच्या असतात, त्याना उद्देशून नसून, स्वदेशामधील त्याच्या लोकांना उद्देशून तो करीत असतो—अशीं भाषणें खात्रीनें कंटाळवाणी आणि प्रसंग विशेषीं संतापजनक असतात परंतु अशा भाषणांची अमेरिकेतल्या कॉंग्रेस किंवा सिनेटच्या, किंवा, इंग्लंड अगर फ्रान्स मधील पार्लमेंटच्या, किंवा मान्याच्या डेप्युटेच्या कोणत्याहि सभासदाला जितकी सवय झाली असेल, तितकीच सवय त्याला आतां संयुक्त राष्ट्र संघातील समित्यांच्या दालनामधील भाषणाची करून घ्यावी लागेल, असा संदेह माझ्या मनांत निर्माण झालेला आहे हे लोकशाहीसाठीं अदात यावयाचें मोल असतें, विशेषतः आंतरराष्ट्रीयत्वाच्या गर्भावस्थेतील लोकशाहीचें हें मोल असेल

कोणत्याहि लोकशाही राष्ट्रीय सरकारच्या यमणे-या अंतर्गत सार्वजनिक वादविवाद चालू असताना किंवा तत्पूर्वी कितीतरी मसलती गुप्तपणानें सुरू असतात त्यांच्यावांचून सरकारचें अस्तित्वच समूळपणानें अशक्य होऊन जाईल चर्चा, बारीक चौकशी आणि वडघोडी यांच्या सहाय्यानें चालविण्यात येणाऱ्या ह्या मसलती, सरकारच्या एखाद्या खात्यामधील विविध शाखांच्या अधिकाऱ्यांच्यामध्यें आणि अनेक खात्यांच्या समित्यामध्यें कार्यालयातच होत असतात कोणत्या तरी एखाद्या क्षेत्रात तज्ञ किंवा जबाबदार

असणाऱ्या व्यक्ती न्याहारी करताना या मसलती करीत असतात पक्षसभेच्या श्रेष्ठी मंडळात देखील त्या करण्यात येतात त्याहिपेक्षा कडी, म्हणजे राष्ट्रीय प्रधान मंडळाच्या बैठकीच्या वेळीं देखील त्या चालत असतात

या सर्व संमेलनासंबंधी एक सर्व सामान्य गोष्ट म्हणजे त्याचें खासगी स्वरूप असतें ही होय हा खासगीपणा निंद्य नसून केवळ सुज्ञपणाचें द्योतक असतो परंतु हें तत्त्व किंवा त्याचा तपशील, याच्यामुळें पार्लमेंट किंवा कॉंग्रेस याच्या वेगळ्याच प्रकारच्या असलेल्या भूमिकेला काहीं विरोध होत नाहीं किंवा तिची आवश्यकता कमी होत नाहीं. परंतु या कायदेमंडळातल्या सुभाषितांचें आणि शिरजोरपणाचें पर्यवसान 'सावळा गोंधळ' आणि "कापा आणि ठोका" यांच्यात जर होणार नसेल, तर मग प्रातिनिधीक सरकारला ते सगळे निरर्थक, नाहींतर घातुक ठरेल.

याच्याच प्रमाणें संयुक्त राष्ट्र संघाचे वादविवाद होत असतात, अर्थात त्याच्यात अगदीं काटेकोर साम्य मात्र नाहीं

संयुक्त राष्ट्र संघाच्या या संघटनाच्या बैठकींत झालेल्या वादविवादानंतर घेण्यात येणारे निर्णय, हे एक तर "शिफारस वजा" अत्याग्रही सूचना असतात व त्याचा जगातील अधिक जबाबदार सरकारावर महत्त्वाचा प्रभाव पडत असतो, किंवा नाहींतर ते मर्यादित हेतूसाठीं एखादी तात्पुरती किंवा स्थायी स्वरूपाची काहीं यंत्रणा बनविण्याच्या कार्यात, विशिष्ट संघटनेतील सरकारानी स्वखुषीनें भाग घेण्यासंबंधीचे निर्णय असतात

आता अर्थात, ज्या सरकाराना अशा प्रकारची ॲड् हॉक स्वरूपाची, कोणतीहि तात्पुरती समिती निर्माण करण्याची, व तींत भाग घेण्याची इच्छा असेल, त्याना संयुक्त राष्ट्र संघामध्यें वादविवादोत्तर ठरावानें तशी समिती स्थापन करण्यास मान्यता मिळविण्याचा त्रास घेण्याची काहींहि आवश्यकता नाहीं, ते स्वतंत्रपणें तसें करू शकतात फक्त तातडीनें पुढें येणारा स्पष्ट मुद्दा असा कीं, आपल्या कृत्यावर, आपण ज्याला संयुक्त राष्ट्र संघ म्हणतो, त्याची टोपी आपण घालावी कीं नाहीं? याच्यापासून फायदे तरी कोणते? संयुक्त राष्ट्र संघाच्या सचिवालयाची सेवा या कामीं घेता येण्याचा मुद्दा, या संबंधांत स्थलतः घेण्यासारखा असला, तरी तो काहीं महत्त्वाचा होत नाहीं. संयुक्त

राष्ट्रसंघाचें जें प्राथमिक कार्य मी आधींच सांगितलें आहे, त्याच्या संबंधीच्या समजुतीमध्यें याचें आवश्यक स्पष्टीकरण दिसून येतें ती समजूत म्हणजे, संयुक्त राष्ट्रसंघ हा एका विश्वव्यापी समाजाचें सजीव प्रतीक असून, तें आपण अधिक गंभीर आणि अधिक वास्तव बनविणें, आपल्याहिताचें आहे, ही होय

काहीं वर्षांपूर्वी मार्शल योजनेच्या द्वारा पश्चिम युरोपमधील स्वतंत्र सरकारांना जो निधी देण्याची तरतूद झालेली होती, त्याची वाटणी करण्यासाठीं एक आंतरराष्ट्रीय स्वरूपाची त्याच देशाची संघटना निर्माण करण्याची खरीखुरी गरज भासली आणि तिच्यामधून—("ओइइसी") युरोपियन आर्थिक सहकार्य संघटना विकास पावली, हें तुम्हांला ठाऊकच आहे. तथापि, "ओइइसी" ही संघटना जर संयुक्त राष्ट्र संघाची एक शस्था बनली असती, तर तें अधिक बरें आणि अधिक सोपें नसतें का झालें ? आता जे "ओइइसी"चे सदस्य आहेत, त्यानाच सदस्य नेमून, तिची स्थापना संयुक्त राष्ट्रसंघाच्या ठरावानें करता आली असती ही संघटना पूर्णपणें सार्वभौम झाली असती, आणि तिच्यात त्याच सरकारांचा आतां आहे तितकाच प्रभाव राहू शकला असता, जे स्त्री पुरुष आज तिच्या सचिवालयात कामावर आहेत, निःसंशयपणानें, तेव्हा सुद्धा तेच स्त्री पुरुष तेंच कार्य करण्यासाठीं नेमण्यात आले असते फक्त फरक येवढाच कीं, संयुक्त राष्ट्र संघानें केवळ तिला चिकटवून घ्यावें लागलें असतें परंतु अशा हेतूसाठीं हा फरक, माझ्यामतें, काहीं तितका क्षुल्लक समजण्यात येऊ नये ही जबाबदारी स्वीकारतांना जर संयुक्त राष्ट्र संघाला डावलले नसतें, तर तिची प्रतिष्ठा आजच्यापेक्षा नक्कीच अधिक उच्च दर्जाची असती कोरियात १९५१ मध्यें आंतरराष्ट्रीय पोलिस कारवाईच्यासाठीं सशस्त्र फौजा पाठविण्याच्या प्रसंगी ही प्रतिष्ठा रणांगणाच्या रोपानें निघाली, तेव्हा संयुक्त राष्ट्रसंघाच्या प्रतीकाचें साहचर्य जर या एका महत्त्वाच्या मोठ्या आंतरराष्ट्रीय आर्थिक प्रेरणेला युरोपात लाभलें असतें, तर त्यामुळें वाढलेल्या तिच्या सामर्थ्याचा प्रभाव अत्यंत महत्त्वाचा ठरला असता

केवळ ज्या सर्व लोकशाही सरकारांना मनापासून जगांतील जनतांच्याकडून संयुक्त राष्ट्रसंघाला व्यापक आणि सखोल पाठिंबा मिळावा असें वाटतें, त्यांनी हें तत्त्व नीट लक्षात ठेवावें, म्हणून मी हें उदाहरण सुचविलें आहे

आपल्या संयुक्त राष्ट्रसंघाचें कार्य आणि भवितव्य यांच्या दृष्टीनें जरी, राजकारण आणि संरक्षण विषयक हालचाली करणें, हें त्याचें केंद्रीय कार्यक्षेत्र असलें, तरी या ठिकाणीं, त्याची तद्विषयक कामगिरी आणि साध्य गोष्टी यांच्याबद्दल फारसें सांगत बसण्याचा माझा हेतु नाहीं तथापि, संयुक्त राष्ट्र-संघाच्या संस्थांच्या मधील राजकीय वादविवाद आणि निर्णय यांचा फल, कधीं कधीं अत्यंत महत्त्वाचा फल, भवितव्याला आकार देण्याकडे झुकत असतो, असा मला विश्वास वाटत आहे. त्यांनीं नवीं राज्यें निर्माण केलीं, काहीं जुन्यांना संरक्षण दिलें. त्यांनीं आक्रमणाच्या वाटा रोखून धरल्या, आणि एका उल्लेखनीय प्रसंगीं तर, आक्रमण झालें तेव्हा त्याचा पाडाव केला.

संयुक्त राष्ट्रसंघाच्या मध्यें झालेले वादविवाद आणि निर्णय यांचा, सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रात होत असलेल्या आंतर्राष्ट्रीय हालचालींच्या प्रगतिवर पडणारा प्रभाव देखील, काहीं कमी महत्त्वाचा नाहीं त्यातल्या त्यात, अशा बैठकांच्या मध्यें दारिद्र्य, रोगराई, अज्ञान आणि मागासलेपणा, किंवा ज्याला संयुक्त राष्ट्रसंघाच्या वर्तुळांत "अल्प विकास" म्हणतात, यांच्या समस्या विषयींच्या हालचालींवर त्यांचा प्रभाव बहुतकरून पडत असतो

सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी ॲरिस्टॉटलनें-राजकीय कार्य पद्धतींच्या एका अद्वितीय चाणाक्ष निरीक्षकानें-असा निर्देश केला कीं, "एखाद्या समाजात तुम्हीं लोकशाही पद्धतीची राज्य-घटना स्थापन केली म्हणजे केव्हांना केव्हा तरी गरीब लोकांनीं स्वतःच्या भौतिक भाग्याला चालना देण्यासाठीं आपल्या मताधिकारांचा उपयोग उठाळी म्हणून करायला, त्यांना तुम्ही अपरिहार्यपणें भाग पाडणार आहांत" अर्थात हेंच तंतोतंत पाश्चात्त्य जगांमधील अनेक लोक-शाही राष्ट्रीय राज्यांमधून या शतकामध्यें घडलेलें आहे, आणि अशाच प्रमाणें ग्रीस मधील नगर राज्यापासून ख्रिस्त शक पूर्व चवथ्या शताब्दीमध्ये घडूं लागलें होतें. अगदीं अपेक्षा करावी त्या प्रमाणें, तीच गोष्ट आमच्या जागतिक समाजांत आंतर्राष्ट्रीय प्रमाणांवर साधे अशीं, राष्ट्रांच्यामध्ये चर्चा व निर्णय यांच्या प्रित्यर्थ एक गिळगिळी परंतु देखील खरी चौरट निर्माण केल्यामुळें घडायला प्रारंभ झालेला आहे. संयुक्त राष्ट्र संघाच्या साधारण आमसभेत-(जनरल असेम्ब्लीमध्ये) ही ज्या जगाची प्रतिनिधी व प्रतिबिंब आहे त्याचा-नक्कर पटण्याचा आवाजच स्पष्ट बहुमताकडून येत असतो. या गोष्टीची त्यांना

जाणीव होत असते यात काही आश्चर्य करण्याजोगे नाही त्याच प्रमाणें ज्या घटनेच्या चौकटीच्या अस्तित्वामुळें हें बहुमत चोरकें होतें आणि मताचा हक्क बजावतें, त्या चौकटीच्या मुळेंच अधिक भाग्यशाली लोकांच्यामध्यें या बहुमत वाल्यांच्या समस्या आणि गरजा यांच्या संबंधी जागरूकता निर्माण होण्यास मदत होत असते परंतु याची जाणीव त्याना होत नसते, याचेंहि आश्चर्य वाटायला नको आंतर्राष्ट्रीय समाजातल्या संस्था स्वत असें कार्य करीत असतात, ही बाब उपहास बुद्धिपेक्षा आशावादीत्वाला अधिक स्थान देणारी आहे

पण संयुक्त राष्ट्रसंघाच्या वैगुण्याचें काय ?

एक अत्यंत गंभीर प्रकारचें घटनात्मक वैगुण्य जें मला दिसतें, तें म्हणून सदस्याला 'व्हेटो' ( नकार ) वापरण्याचा दिलेला अधिकार होय जर्मनी, जपान, इटली आणि अनेक अन्य राष्ट्रें यांची अनुपस्थिति देखील एक खरोखरच हानि आहे, आणि जेव्हा हीं राष्ट्रें बलाढ्य बनतील, तेव्हा ती हानि अधिकच वाढ ण्याचा संभव आहे त्याशिवाय चिनी प्रतिनिधीत्वाची नाजुक आणि विवादास्पद समस्या आहेच ही समस्या नवा सदस्य करून घेण्याची नाही तर स्पर्धालु अशा दोन राजवटींमधून एकटीलाच मान्यता देण्याची आहे संयुक्त राष्ट्रसंघात किंवा इतरत्र वादविवाद व वाटाघाटी चालू असताना चीनच्या मुख्य भूमीवर प्रत्यक्ष असलेल्या सत्तेच्या अनुपस्थितीमुळें, चीनच्या परिघातील वादग्रस्त प्रश्नासंबंधीं—कोरिया, फार्मोसा, इंडोचीन यांच्याविषयीं संयुक्त राष्ट्रसंघा मार्फत कोणतीहि प्रभावी तडजोड घडवून आणणें बिकट होत असतें अशा समस्यांच्याबद्दल जर आणि जेव्हा काहीं हालचाल जागतिक संघटनेच्या मार्फत मनसमजावणी मसलती किंवा अन्य शांततेच्या कार्यपद्धति द्वारा करायची झाल्यास ( मला या वेळी प्रत्यक्ष राजनैतिक वाटाघाटींना अनुलक्षून काहींहि म्हणायचें नाहीं )—एकतर कम्युनिस्ट चीनला संयुक्त राष्ट्रसंघात येणें भाग आहे किंवा संयुक्त राष्ट्र संघाला तरी त्याच्याकडे जाणें भाग आहे याचें खात्री पटवून देणारें उदाहरण म्हणजे जिनेव्हा येथें १९५४ मध्यें भरलेली "सुदूरपूर्व परिषद" हें होय तथापि ही परिषद काहीं संयुक्त राष्ट्र संघाची नव्हती

जगातील काहीं भागात राज्याची फाळणी करून टाकणाऱ्या दोन प्रभावी सत्ता असल्यामुळें निर्माण झालेली समस्या काहीं काळ बाजूला ठेवून, असले

मिळून सदस्यत्वाचे प्रश्न, ज्याला आता "गंजिफ्याची वाटणी" म्हणतात, त्या पद्धतीनें सोडविले पाहिजेत. फाळणी, आणि त्यामुळें दुभंगलेल्या राष्ट्रांना संयुक्त राष्ट्र संघानें सदस्यत्व देण्यास होणारी दिरंगाई, हे प्रश्न शीतयुद्धाचे दुर्दैवी परिणाम होत. आपण आणखी एक गोष्ट मान्य केली पाहिजे कीं, अशा या "गंजिफा पद्धतीच्या" सदस्यत्वाला जी प्रौढाची हरकत येते, तिचें मूळ गंजिफ्याच्या किंवा त्यांच्यावरील बाह्य आवरणाच्या वस्तुस्थितीत नसून आतल्या वस्तुस्थितीच्या आशयाविरुद्ध असतें. असल्या प्रकारें गंजिफा पिसून निर्णय घेण्याची तडजोडीची पद्धति म्हणजे "भटाचें नांव कानभट" अशीच असते. जेथें विविध प्रकारचे हितसंबंध असतात, तेथें राजकारणात अथवा उद्योगधंद्यात, कोणत्याहि गोष्टीसंबंधी प्रगति करण्यासाठीं हा "कार्थे किम्" असा परंपरागत न्याय, तडजोडीचें सुंदर नाव असतो.

माझ्यामतें, या सदस्यत्वाच्या भानगडी व्यतिरिक्त, 'व्हेटो' बद्दल सुद्धां संयुक्त राष्ट्र संघानें आता ज्या यंत्रणेची तरतूद केली, तिचा लवचिकपणा लक्षात घेता, फारशी काळजी करीत बसण्याचें कारण नाहीं. रशियनांना सुरक्षा समितीत आपला 'व्हेटो' चा अधिकार वापरून संयुक्त राष्ट्र संघाला असेंब्लीच्या मार्फत एखादी गोष्ट करायला प्रतिबंध करता येणें शक्य नाहीं. असेंब्लीमध्यें बहुमतात असलेल्या सदस्यांची कृति करण्याची इच्छा, आणि ती कृति करण्यासाठीं लागणारी शारीरिक योग्यता, यांचें पाठबळ आवश्यक असतें. अगदीं अडथळे निर्माण केले, तरीसुद्धा प्रगति करणें, ही कांहीं राजनीति धुरंधर आणि घटना विषयक कायदेपंडित यांच्या कौशल्याच्या आवाक्या बाहेरील अवघड बाब नसते हें 'लिटल् अर्ल्' " आणि "शांतता टपावरील ऐक्य" अशा सूत्रांनीं दर्शविलें आहे. प्रेग रिग्न, अमेरिका किंवा इतर लोकसत्ता, यांच्या घटनात्मक इतिहासाचें अध्ययन करणाऱ्या कोणत्याहि विद्यार्थ्याला हें माहित आहे कीं, घटनाविषयक कायदे आणि व्यवहार यांच्यामधील हा लवचिकपणा आणि हें कौशल्य, यांच्यामुळे लोकसत्ताक समाजाची सुदृढ वाढ होण्यास महत्त्वाची मदत झालेली आहे.

सगळ्या स्वतंत्र माणसांना विशिष्ट देशांची अनुपस्थिति असल्याबद्दल जरी खेद वाटत असला तरी कांहीं असेहि आहेत, कीं त्यांना सोव्हिएट रशिया आणि 'कॅमिनफॉर्म' ह्या बहुभागी शत्रूच्या कारणानें या जागतिक

संघटनेत दौर्बल्य आलें आहे असें वाटतें हा मुद्दा विचारात घेण्याजोगा आहे

संयुक्त राष्ट्र संघाच्या वादविवादात कॉमिन्फार्म देशाचे प्रतिनिधी भाग घेतात राष्ट्र संघाचा उपयोग आपल्या देशाच्या सीमेबाहेरील लोकमतावर प्रभाव पाडण्याचा प्रयत्न करण्यासाठीं, प्रचाराचें जाहीर व्यासपीठ या दृष्टीनें ते करीत असतात अर्थातच, यामुळें अन्योन्य संबंधाच्या सहतर अभावाची गुतागुत निर्माण होतेच संयुक्त राष्ट्रसंघामधील वादविवादांचा कसलाहि प्रभाव कम्युनिस्ट देशामधील लोकमतावर पडण्यास प्रतिबंध करण्यासाठीं माणसें आणि वार्ता यांच्या हालचाली नियंत्रीत करणें, आकाशवाणी गुदमरून टाकणें, सेन्सार आणि दळणवळणाची सगळी साधनें यांच्यावर एकतंत्री अमल, अशा प्रयत्नांची पराकाष्ठा सोवियत नेते करीत आहेत

पोलादी पडद्याचा गर्भितार्थ कम्युनिस्ट साम्राज्यामधील जनतेच्या बाह्य जगताशीं कसल्याहि प्रकारच्या सामाजिक संपर्काला नकार देण्याच्या प्रयत्नात सामावलेला आहे दरोबरच, कोणत्याहि व्यक्तींच्या किंवा माणसाच्या गटाच्यामध्यें सामाजिक संपर्काचा कसलाहि स्वाभाविक विकास होण्याविषयी भय वाटणें, हें सोव्हियत हुकूमशाहीच्या स्वभावाचें मूलभूत तत्व आहे कारण तिला स्वयंप्रेरणा आणि कोणत्याहि प्रकारचें स्वातंत्र्य यांच्या विषयी अतीव घृणा वाटत असते त्या कारणानेंच कम्युनिस्ट राज्यकर्ते, कोणत्याहि प्रकारें त्यांच्या स्वत च्या प्रजाजनात एखाद्या जिवंत समाजाची वाढ होऊं देण्यास प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करीत असतात

आपण बाहेरचे लोक पोलादी पडदा म्हणून जें काहीं अवलोकन करीत असतों तें केवळ एका क्षितिजाला मिळलेल्या उभ्या सरळ सुळके वजा रचनेचें-एक प्रकारच्या पोलादी आवरणाचें एक टोक असतें हे असलें आवरण जगातल्या तिसऱ्या हिश्याइतक्या प्रदेशावर आणि जवळपास एक महापद्म इतक्या लोकसंख्येवर क्रेम्लीन आणि पकिंग मधील महाशयांनी घातलेलें आहे

मानवतेच्या दरबाराकडे जाण्याचा प्रवेशमार्ग (मग तो कितीहि अर्ध कच्चा आणि अपूर्ण असला तरी) होण्याच्या संकल्पानें संयुक्तराष्ट्र संघ अस्तित्वात आला पण त्याच्या काळजावरच हा पोलादी पडदा किंवा आवरण घाव घालीत आहे इतर जगाशीं सर्वच क्षेत्रात संबंध ठेवण्याची कम्युनिस्ट

नेत्यांची मूलभूत कल्पना एकाच बाजूने प्रवेश असणाऱ्या मार्गासमान असते. आपण जर हें ओळखलें नसेल, तर आपली फसवणूक होईल.

आपले प्रजाजन वास्तविक जगाचें दर्शन किंवा श्रवण करतील, यासंबंधी कम्युनिस्ट नेत्यांना भय वाटत असलें, तरीसुद्धां आमची स्वतःची कल्पना त्यांच्या विपरीत आहे. आपल्या नागरिकांनी सत्तेचे संपूर्ण चित्र-पूर्णपणें उमटलेलें प्रतिबिंब,-अगदीं 'चामखिळासारखे समूळ दोष दाखवून देणारी, आणि शक्य तो वास्तविक प्रमाणबद्धता असलेली प्रतिकृति,-जर अवलोकन केली नाहीं आणि अपुरे चित्र पाहिलें, तरच लोकसत्तांना भीति वाटत असते. यापेक्षां कमी असें कांहीं घडत असलें, तर तें आपण ज्या सिद्धांताला विरोध करीत असतों, त्यालाच आपली शरणागति समजावी.

याचा अर्थ संयुक्त राष्ट्र संघाच्या सदस्यत्वाच्या प्रभावापुरता तरी असा होतो कीं, जर राष्ट्र संघाच्या आम सभेंत कम्युनिस्ट प्रतिनिधी हजर राहिले नाहींत, तर त्याचा फायदा लोकसत्तांना कमी प्रमाणांत मिळूं शकेल. युरोपमधल्या कम्युनिस्ट देशांच्या प्रतिनिधींची उपस्थिति आणि सोवियत गट-सदस्यांच्या तडजोडशून्य उद्दंड वृत्तीचा अनुभव यांचा उपयोग आपल्याला होतोच.

रशियनांच्या बरोबर व्यवहार करतांना कोणत्या अडचणी येतात, आणि त्यांच्याशीं वागण्याची योग्य पद्धति कोणती, यांच्याविषयीं, (जनता व कांहीं देशांतील मुत्सद्दी यांना) शिक्षण मिळण्यासाठीं त्यांचा उपयोग होऊं शकतो. आमच्या एकाग्र दृष्टि पुढें कम्युनिस्टाचें स्वतःचें सामर्थ्य आणि दौर्बल्य उघडें पडतें.

कम्युनिस्टांनीं भाग घेतल्यामुळें आपली सुद्धां एक फायदा झाला. जगांतील कम्युनिस्टेतर सरकारांच्यामध्यें ऐक्याची भावना निर्माण झाली. कम्युनिस्ट देशानीं आमसभेंत भाग घेणें, स्वतंत्र जगाच्या दृष्टीनें मला कसें मोलाचें वाटतें, त्याचें प्रमुख कारण मात्र हें नव्हें.

तथापि, सोवियत संघ आणि त्याचीं सामंत राज्यें, संयुक्त राष्ट्र संघात जो भाग घेतात, त्याला मी महत्त्व देतों. विश्वव्यापी आंतर्राष्ट्रीय रचना किंवा समाज साकार करण्याच्या, परंतु अद्यापि गर्भावस्थेत असलेल्या, ध्येयाच्या गाभ्यांत त्याचें आदिकारण दडलेलें आहे. कोणत्याहि स्वरुपांत या ध्येयाचें

दर्शन आम्हाला आमच्या मानवी संबंधाच्या स्नेहबंधाचे, आणि आमच्या विरोधकाच्या बरोबर सुद्धा अंतिम मित्रभाव स्थापन करण्याचें, स्मरण करून देत असतें. आपण जर कोणत्याहि प्रकारें हीन भाव सांभाळू शकलों, तर आपल्याला कोणाचा तिरस्कार करावा लागणार नाहीं, माझ्यामतें याला मोठें मोल आहे.

प्राध्यापक बटरफिल्ड यांनीं, आपल्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या "ख्रिस्ती-धर्म, राजनीति आणि युद्ध" या विषयावरील ग्रंथात, हा दृष्टिकोण अत्यंत स्पष्टपणें व चांगल्या पद्धतीनें विशद केलेला आहे—

"तुम्हाला जर आंतर्राष्ट्रीय समाज—व्यवस्थेनें भारून टाकलें असेल, किंवा तुमची इच्छा जर तशा व्यवस्थेचें अस्तित्व, किंवा त्याचा अंमल, याच्या विषयीं आग्रह धरण्याचा असेल, तर युद्धाच्या ध्येया पासून विच्छुप्त राहणाराचा पक्ष म्हणून तुम्हीं पुढें सरलें पाहिजे, (मी याच्याच जोडीला धीत युद्धाचीमुद्दा गाठ मारीत आहे) आणि या रचने बाहेर असणाऱ्या रानटी टोळ्यांशीं जणु काय आपण झुंजतच आहोंत, असें मानून युद्धा विषयीं तुम्ही कोणतीच कल्पना मनांत आणतां नये... ..जोपर्यंत आंतर्राष्ट्रीय रचना अस्तित्वात राहील, किंवा तशी ती अस्तित्वात रहावी असें आपल्याला वाटत राहील, तोपर्यंत दुराग्रहामुळें पेटणाऱ्या युद्धाला ठावच राहणार नाहीं. फक्त महत्त्वाच्या दोस्त राष्ट्रामधील एखादा भांडण-तंटा, किंवा मित्राच्या मधील काहीं कुरबुरी, अशाप्रकारच्या लक्षणात मात्र तें अस्तित्वात असायला काहीं हरकत नसावी."

आमच्या स्वतंत्र समाजाच्या सचोटीशी सुसंगत असणाऱ्या पद्धतीनें शांतता साध्य करून घेणें, हेंच आमच्या धोरणाचें सर्वोच्च ध्येय असलें पाहिजे. या ध्येयाच्या शोधात सामुदायिक संरक्षणासाठीं संयुक्त संघटनाची मोठी महत्त्वाची भूमिका आहे स्वाभाविकपणें, नाटोसारख्या संयुक्त संघटना आक्रमणांना पायबंद घालण्यासाठींच बनविण्यात आल्या. काहीं राष्ट्रांच्या हालचालींमुळें भीति आणि अविश्वास वाटल्यामुळें या संयुक्त संघटना निर्माण करण्यात येतात व त्या राष्ट्रांना अशा संघटनांतून सदस्यत्व नाकारण्यात येत असतें परंतु संयुक्त राष्ट्रसंघाला मात्र प्रतिबंधक पायबंद घालण्याच्या धोरणापेक्षा अधिक सखोल आणि अधिक सुदूरदृष्टि असणारे हेतू साध्य करावयाचे आहेत आपलें अंतिम

उद्दिष्ट प्रतिपक्षाचें मन वळवायचें आहे, तसेंच ज्या समाजांत एका मुदिनीं आपले सगळेच विश्वाधव सहभागी होतील, अशा समाजाचा विकास करण्याचें मुद्दा तें आहे संयुक्त राष्ट्रसंघ याचेंच स्मरण आपल्याला करून देण्याचें कार्य करीत आहे त्यामुळें अत्यंत महत्त्वाचा आक्रमक देशील, त्याचें मन वळविण्यासाठीं व त्याच्या सहकार्यासाठीं, या विश्वव्यापी संघटनेंत असणें महत्त्वाचें झालेलें आहे

संयुक्त राष्ट्रसंघाच्या विविध प्रातिनिधीक संसदा आणि मंडळें, याच्या मूल्यावर मी याच कारणामुळें विशेष जोर दिलेला आहे त्याचें कारण विविध प्रश्नांच्या बाबतींत सरकारांना जाहीर धोरणाचा आविर्भाव धारण करण्यास हीं मंडळे नि संसदा भाग पाडतात आणि वस्तुत बाटाघाटी करण्यास त्यांना प्रवृत्त करतात, हें होय त्याच प्रमाणें, महत्त्वाचें म्हणजे मनुष्य जातीच्या, सर्वांना समान अशा हिताला अनुलक्षून ठरविलेल्या, जागतिक धोरणाचीं अभिष्टें आणि उद्दिष्टें सतत आमच्या दृष्टिपुढें ठेवण्याचें कार्य या संसदा नि मंडळें करू शकतात

संयुक्त राष्ट्र संघाची महत्त्वाची भूमिका, मला जशी दिसते, तशी संक्षेपानें सांगतो ती म्हणजे प्रमुख जागतिक स्वरूपाच्या समस्या, त्याच्या रास्त प्रमाणात आमच्या हितसंबंधाच्या अंतर्भूत समाजाच्या पार्श्वभूमीपुढें वास्तविक केंद्रस्थानी एकत्र आणणें होय माझा हा दृष्टिकोण मी १९५४ सालीं संयुक्त राष्ट्र संघाच्या आमसभेमध्यें चर्चेचा प्रारंभ करणाऱ्या माझ्या भाषणात मांडण्याचें साहस केलें होतें मी तेव्हा म्हणालों —

"तंत्र शास्त्रीय कार्यपद्धतीची उत्क्रांति, आणि आण्विक विज्ञानामधला विकास, याच्यामुळें मानव-जाति अत्यंत त्वरेनें परस्परावलंबी बनली, परंतु ही जाणीव जगाच्या पाठीवरील कोणत्याहि भागातल्या लोकमताला किंवा सरकारांना झालेली नाहीं परंतु दुर्दैवानें, आमचें परस्परावलंबन जसजसें वाढत आहे, तसतसे आमचें भेद सुद्धा तेज धरीत आहेत आपण जर आपल्यात सुखशांतिस्थिरत्व निर्माण करणारा एखादा मार्ग शोधून काढला नाहीं,-जर विभागलेल्या मनाची समजूत घातली नाहीं, तर आपले भेद आपणां सर्वांचाच नाश करतील, अशी ही आज नाकारता न येण्याजोगी वस्तुस्थिति आहे, या वस्तुस्थितीमुळेंच वाटाघाटी करण्याचें, प्रतिपक्षानें

मन वळविण्याचें, आणि ऐक्य संपादण्याचें, केंद्रस्थान या नात्यानें संयुक्त राष्ट्र संघाचें महत्त्व अधिकाधिक वाढत आहे तथापि एकतंत्री सत्तावादाला अभिप्रेत असलेली निर्जीव एकविधता, म्हणजे ही ऐक्य-भावना, असें मात्र मी म्हणणार नाहीं

"आपली जर या भेदाच्या बाबतीत काहीं कर्तव्यें असतील तर आधीं आपण त्यांना मान्यता दिलीच पाहिजे आणि ते भेद समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे

"अगदी पहिला मूलभूत भेद म्हणजे एकसत्ताक राज्यपद्धति आणि स्वतंत्र समाज हा होय पहिल्या पद्धतीत नागरिक हा राज्याचा निव्वळ चाकर बनतो आंतर्राष्ट्रीय बाबतीत, दिशाभूल आणि गोंधळ उडविण्यासाठीं "शांतता" आणि "सहजीवन" या शब्दांची तेथें खूप लैरात करण्यात येते तरीसुद्धा, दंडेलीवर विश्वास आणि आक्रमक भाषा प्रयोग, ही तेथील सर्व सामान्य पातळीवरली प्रगति असते याच्या उलट, स्वतंत्र समाजाच्या रचनेचा पाया ज्या तत्वावर आधारलेला आहे, तें तत्त्व व्यवहारात जरी कितीहि अधुऱ्या स्वरुपात आचरला आलें तरी, त्याच्या अन्वयें मनुष्याला काहीं कर्तव्यें व हक्क प्राप्त झालेले असतात स्वतःचें स्वातंत्र्य आणि सुरक्षितपणा आणि ( यांना कायदा आणि न्याय यांच्या योगानें ) यांचे संरक्षण करण्यासाठीं त्यानें निर्मिलेल्या राज्याच्या आणि सरकाराच्या संबंधींच्या त्याच्याच कर्तव्यापेक्षां तीं श्रेष्ठप्रकारचीं असतात

नंतर, जगाची स्वयंशासित आणि परतंत्र अशी फाळणी करणारा आणखी एक भेद आहे अनेक लोक या भेदाचें साम्य, एकीकडे वासाहतीक राज्य-कारभार असणारें देश आणि दुसरीकडे परतंत्र परावलंबी प्रदेश यांच्या मधील भेदाशी दर्शवितात परंतु माझ्यामतें तें चूक आहे अर्थातच, जगाचा परतंत्र भाग याच्यापेक्षां कितीतरी मोठ्या अधिक प्रमाणात, खरोखरच मोठ्या अतुलनीय प्रमाणात अस्तित्वात आहेत केवळ लष्कर आणि पोलिस यांच्या नियंत्रणामुळेच प्राप्त झालेल्या सत्तेच्या जोरावर, जर एखादा हुकूमशहा एखाद्या जनतेवर राज्य करीत असेल, तर तो जनतेच्या वंशात जन्मलेला व त्यांचीच भाषा बोलणारा असला, तरी

सुद्धा, ती जनता स्वयंशासित आहे, असे मानता येणार नाहीं. एखाद्या बाहुले बना मांडलिक राज्यामधील, हुकूमशाही हस्तकांच्या आज्ञांकित असलेली जनता, एखाद्या वसाहती मधल्या जनतेपेक्षा किती तरी अतिशय मोठ्या प्रमाणात परतंत्र असते, कारण वसाहतीमधील जनता, लोकसत्ताक स्वराज्यांतर्गत राष्ट्रीय स्वातंत्र्याकडे कधीं कधीं मंदगतीनें का होईना, पण नक्की वाटचाल करीत असते

त्या शिवाय जगाचा अत्यंत मुख्य असा, औद्योगिक कारखाने असलेला व त्याच्या अनुषंगानें संपन्न भौतिक जीवनमान असलेला भाग, आणि ज्याला "अविकसित प्रदेश" म्हणतात तो भाग, असाहि एक भेद आहे संयुक्त राष्ट्र संघाच्या नेतृत्वाखालीं आपण या संबंधीं थोडेफार प्रयत्न करीत आहोत,—परंतु आमची कार्य पद्धति मात्र धिमी असणें अपरिहार्य होतें परंतु तिचें सातत्य टिकेल, अशी मला आशा वाटते

"या अशा खोलपणानें विभागलेल्या जगात संयुक्त राष्ट्र संघ कार्य करीत आहे, आणि खरोखरच त्याची अधिक असंदिग्ध गरज आपल्या त्या भेदांच्यामुळें वाढू लागली आहे या प्रत्येक भेदाच्या, प्रत्येक कडेच्या मनुष्यांचें प्रतिनिधीत्व संयुक्त राष्ट्र संघ करीत असतो, आणि आपल्या घटनेंत नमूद केलेल्या तत्त्वांत वैचित्र्य आणल्या वाचून, किंवा त्याच्याशी बेइमान न होता, त्यानें आपल्या कार्य पद्धती प्रमाणें त्या सर्वांच्यासाठीं झटण्याचा प्रयत्न करीत राहिलें पाहिजे "

"आमची दिशा स्पष्टपणें निर्देशित आहे, तिचा रोख आर्थिक व सामाजिक प्रगतिकडे आणि दारिद्र्यापासून दूर असण्याकडे आहे आमची वाटचाल संपूर्ण आणि स्वतंत्र स्वय शासनाकडे चालू आहे आणि अंतर्गत किंवा बाह्य शक्तींनें लादण्यात आलेल्या हुकूमशाही राजवटीपासून ती लांब जात आहे. आम्ही मानवी हक्कांच्या प्रगतीवर मनयाकडे, आणि वैयक्तिक मानवाचें मूल्य व प्रतिष्ठा याकडे आपला निघालो आहोत '

———

# ६ : मानवी सुधारणांच्या मधील संबंध

आतापर्यंत, ज्या नव्या प्रमाणांत लोकशाही आणि जागतिक राजकारण यांच्या समस्या सध्या प्रगट होत आहेत, त्यांच्या गुंतागुंतींची छाननी आपण केली. तसेंच आतां मानवाला धोरणाचें एक साधन म्हणून, प्राप्त झालेल्या भीषण संहारक सामर्थ्याचा, आणि ज्यांच्या वतीनें धोरण संबंधींचें निर्णय घ्यावे लागतात, त्या विस्तृत केलेल्या आंतरराष्ट्रीय समाजाचाही आपण विचार केला त्या नंतर, आंतरराष्ट्रीय संघटनांचें,—विशेषतः संयुक्त राष्ट्रसंघाचें स्वरूप आणि कार्य, आणि सद्य-परिस्थितींतले राजनीतीचे व्यवहार आणि वाटाघाटींची कार्य पद्धति, यांचें सुद्धां आपण समीक्षण केलें आहे

परराष्ट्रीय धोरणाच्या समस्यांनीं आमच्या पिढींत नव्या भव्याकार पद्धतीनें आपलें स्वरूप प्रगट करण्याची जी आगळी एक दुसरी बाब अवगत करून घेतली आहे, तिचा संबंध मानवी सुधारणांच्या मधील नात्याशीं असतो.

कित्येक शतकें युरोपमधील पाश्चात्य राष्ट्रांच्या परराष्ट्रीय धोरणाचे महत्त्वाचे प्रश्न त्यांच्या परस्परा मधील बदलत्या संबंधांचीं प्रतिबिंबें मात्र असत आज अत्यंत दूरगामी समस्या एकाच मानवी सुधारणेच्या अंतर्गत नांदणाऱ्या राष्ट्रांच्या मध्येच उद्भवत नसतात, तर त्या खुद्द मानवी सुधारणांच्या मध्येंच उपस्थित होत असतात

आज जर एखाद्यानें आशियावर नजर टाकली, तर त्याला तेथें इतर वस्तुस्थितींना मागें सारून अग्रभागीं एक वस्तुस्थिति आढळेल ती म्हणजे आशियाचें प्राचीन जीवन आणि संस्कृति यांच्या पुनरुज्जीवनाची चळवळ होय सर्व पौर्वात्य देशांत त्या चळवळीची एक जोराची प्रचंड लाट उसळली आहे. त्यांच्यात एक नवें चैतन्य खेळत आहे एका शतका पूर्वी पौर्वात्यांनीं, त्यांच्या पाठीशीं महान पराक्रमी कृत्यांचा दिव्य भूतकाल असून सुद्धां फक्त त्या परित्यक्त परंतु सुंदर भूतकालाची श्रद्धा घरकोंबडेपणानें उराशीं बाळगली आणि आपण अगतिक व त्याणु असल्याबद्दल सगळ्या जगाची समजूत करून दिली आज पौर्वात्य जनता नव्या ध्येय दृष्टीमुळें आतुर आणि अस्वस्थ झाल्या आहेत, आणि स्वातंत्र्य आणि समाज-कल्याण हीं नवीं ध्येयें साध्य करून घेण्याचा त्यांचा कृतनिश्चय अत्यंत बलवान बनला आहे

सदिच्छा असलेल्या सर्व मनुष्याना स्वागतार्ह वाटू शकणारी अशी ती गोष्ट आहे इस्लामी जगत, भारत, आणि आग्नेय आशिया याच्यामधील जनताना एका नव्या व संपूर्ण जीवनाकडे जाण्याची ओढ लागलेली आहे आपल्या स्वत च्या संस्कृतींच्या आणि परपरांच्या बरोबर कशाहि प्रकारे आधुनिक तात्त्विक कर्तृत्वाचा सयोग घडवून आणण्याची त्याची उत्कठा आणि त्याचे प्रयास जागृति दर्शविणारे आहेत, आणि जगाला ते संपूर्णपणे आशादायक वाटू शकण्यासारखे आहेत

या उचबळून आलेल्या उत्साहाच्या लाटेचें चैतन्य, आणि तिचें गभीर स्वरूप याचे मूल्य कुणीहि कमी लेखू नये किंवा त्यांचा विपरीत अर्थ करू नये पूर्वेकडे जमास यणारे हे नवे राजकीय समाज आपल्याला पश्चिमेत परिचीत असलेल्या राजकीय समाजाच्या प्रतिकृती होतील, अशी कल्पना करणे, हास्यास्पद ठरेल प्राचीन मानवी सुधारणानें हें पुनरुज्जीवन नक्कीच आता नव आकार धारण करील म्हणूनच नम्रतेनें आणि जागरुकतेनें शिकणारानो हा एक वेगळाच आणि सपूर्ण विचारकर्षक अनुभव मिळू शकेल

गतकालात, त्याच्या विकासाच्या कालखडात, सगळयाच महान मानवी सुधारणा, स्वत च्या विस्ताराकडे, तुम्ही 'साम्राज्यवादाकडे" म्हणा हवें तर, झुकू लागल्या होत्या पूर्वेच्याप्रमाणेंच पश्चिमेच्या बाबतींत सुद्धा हें तितकेंच खरें आहे आतापर्यंत अशा विस्तीर्ण सुधारणाच्या मधील नित्याचे सबध सघर्षाचे फार झालें तर अस्वस्थतादर्शक सामयिक सधीने असत, पण आता आपण एका अशा युगात प्रवेश करीत आहोत, की तेथें नेगनेगळ्या मानवी सुधारणांना परस्पराच्या साहचर्यात राहून शान्ततेनें आदान प्रदान करायला, एकमेकांच्या ज्ञानाचा लाभ घ्यायला, एकमेकांचे इतिहास आणि आदर्श, आणि कला आणि संस्कृति यांचें अध्ययन करायला, व परस्पराची जीवनें सुसपन्न करायला, मिळून येणें मम प्राप्त झालें आहे अतिगर्द झालेल्या या ल्हानशा जगात, नाहीतर आगामी अन्य पर्याय, म्हणजे गैरसमज, खेद, भय आणि सर्वनाश, हे आहतच

होते आणि त्याली दडपण्याचा प्रयत्न करून तिला सतावले होतें परंतु आज पहिल्या प्रथमच जगातल्या सर्वच मानवी सुधारणांना सामुदायिक धोका निर्माण झालेला आहे, आणि त्यातल्या काहीं बऱ्याच मोठ्या प्रमाणात एका नव्या प्रकारच्या प्रचंड, सघटित आणि निर्घृण रानटी प्रवृत्तीला तात्पुरत्या शरण गेलेल्या आहेत

ज्या युगानें इटालीचे फॅसिस्ट, जर्मनीचे नाझी, आणि रशियन व चिनी कम्युनिस्ट, यांच्या अनुभवाचा प्रसाद चाखलेला आहे, त्याला या एकतंत्रतावादी हुकूमशाहीच्या विकासाचें संकट समजावून देण्याचें श्रम घ्यावयास नकोच मूल्यांचा निर्धारी इकार आणि सत्तेचा पाठलाग यानाच अंतिम साध्य मानण्याचें भयंकर आकर्षण, एका विशिष्ट मनोरचनेच्या परंतु अन्यथा बुद्धिमान असणाऱ्या व्यक्तींना यांद्व शकतें सर्व वस्तू आणि सर्व व्यक्ती यांचें कौशल्य सत्तेच्या एकमेव साध्याचें साधन बनविण्याचा तत्त्वेवाईक प्रयत्न मुद्दा एक प्रकारे सर्वोगीचा भाग असल्याचें सिद्ध होऊ शकेल, आणि काहीं काळ तो एक प्रबळ सामाजिक प्रेरणा निर्माण करू शकेल

त्याशिवाय, ही निरिल नकारवादी निहिलिस्ट प्रेरणा सोयीस्कर आदर्शांच्या गुप्त सापळ्यांनीं मुक्त होते, व अशा निरक्षित देशात राष्ट्रवाद आणि सामाजिक प्रगति यांच्या सामुदायिक चळवळी स्वत च्या कब्जात आणते, आणि अशा प्रकारें सहस्रावधि प्रामाणिक आणि निष्ठावंत स्त्री पुरुषांची चैतन्य शक्ति आपल्या कार्यासाठीं जुंपून घेऊ शकतें काहीं दशकाच्या आनंद मूठभर कम्युनिस्टांनीं, युरोपात आणि आशियात कोट्यावधि जनतेला आपल्या राजकीय व सामाजिक साध्यावर आणलें आणि परिणामकारक राज्यकारभाराच्या, एका विशिष्ट पद्धतीकडे आणण्याचा मार्ग निर्माण करणाऱ्या घटनानें संचालन घडवून आणलें

या विस्मयकारक आणि भीषण महत्कृत्यानें, आणि विश्वव्यापी संघर्षाच्या दृष्टीनें त्याच्या झालेल्या परिणामानें, आमच्या बहुतेक राजकीय विचारसरणीवर निराळाच रंग चढला आमच्या बहुतेक भयांच्या केंद्रीकरणाचा एक मध्य बिंदु निर्माण झाला, आणि आमची बहुतेक परराष्ट्रीय राजनीति अशा प्रकारें १९४५ सालापासून सावध व कार्यतत्पर बनली

परंतु मला असें दिसतें की, कम्युनिझमशी व्यवहार करण्याचें धोरण म्हणून आमच्या प्रमुख आंतरराष्ट्रीय समस्येकडे आवश्यकपणानें पाहण्याची, आणि शीत युद्धाच्या दृष्टीनें जगाकडे पाहून त्याचे दोन ध्रुव कल्पिण्याची प्रवृत्ति, अत्यंत धोकादायक आणि अति भाबडेपणाची आहे आमच्या आवश्यक समस्या अजूनहि बनता, आणि त्याच्या सुधारणा=अथवा त्याचा अभाव, याच्या संबंधीच आहेत आम्हाला दारिद्र्याच्या या समस्यांच्या बाबतीतसुद्धा व्यवहार करताना, आमच्या धोरणाचा आधार, मार्क्सवादी छपराच्या खाली नांदत असलेल्या रशियन आणि चिनी समाजाच्या वास्तवता वेगळ्या करण्यावर आणि मग त्यांच्याशी व्यवहार करण्यावर, काहीं अंशीं अवलंबून आहे. त्याशिवाय, आशियातल्या घातलेल्या धोक्याचा बंदोबस्त करताना आपण कम्युनिझमपेक्षा चीनच्या साम्राज्यवादाबद्दलच बोललो तर बरें, असें मला वाटतें कारण आशियावासीयांना साम्राज्य वादाची कल्पना ( अनुभवानें ) आहे, आणि त्या मानानें बहुसंख्य स्वतंत्र आशियावासी लोकांना कम्युनिझमचें संकट अस्पष्ट वाटतें, किंबहुना त्यांना खरोखरच त्याचा अर्थ सुद्धा कळत नाहीं

मला वाटतें कीं, आपण रशियन झार आणि चिनी सम्राट यांच्या चरित्राचा आणि कारकिर्दींचा अभ्यास केल्यास, त्याचा मास्को व पेकिंग येथें आज ज्या अडचणी आपल्यास येतात, त्यांच्या विषयीं समजूत होण्याच्या दृष्टीनें, आणि विरोधविकासवादाच्या शानातला तज्ज्ञ होण्यासाठीं, मोलाची मदत होऊं शकेल

अर्थातच, आपण ध्येयवादी दृष्टीचा संकोच करावा, असें मला म्हणावयाचें नाहीं ती दृष्टि तर मूलभूत महत्त्वाची आहे, अशी माझी श्रद्धा आहे परंतु या भूमिकेवरून कम्युनिझमचा हल्ला परतवून लावण्यापेक्षां, आपल्या स्वतःच्या श्रद्धेला जागतिक मूल्यें प्राप्त करून देण्यातच, आपल्या यशाचा स्रोत अधिक आहे कसा तेंच मी पुढें समजावण्याचा प्रयत्न करणार आहे आपण ज्या प्रमाणात हीं मूल्यें आपल्या कृती आणि आपली धोरणें यांच्यात अंतर्भूत करूं, त्याप्रमाणांत ती श्रद्धा आमचें नैतिक आणि बौद्धिक सामर्थ्य ठरेल ती एखाद्या संसर्गा प्रमाणें पसरत गेल्याचें सिद्ध होईल, आणि कम्युनिझमचे दुबळे सिद्धांत, आतापर्यंत जसे वरकरणी प्रतिगामी गोष्टींच्या बाबतीत मान्यता पावत आले, त्याप्रमाणेंच मान्यता पावत राहतील

मी पाहतों कीं, एकतंत्रतावादी हुकुमशाही, आपल्याला ज्यांना सामना द्यावा लागतो अशा कितीतरी समस्या मुद्दाम उपस्थित करते किंवा फुरसतीसाठीं त्या उकरून काढीत असते परंतु या समस्या कांहीं तिनें निर्माण केलेल्या नसतात, आणि म्हणूनच तिच्या विषयींचें आमचें उचित चिंतेकाम्य आणि तिच्या बद्दलचीं आमचीं मर्ये, याच्यामुळें त्या समस्यांपासून आमचें लक्ष आम्हीं अयोग्यपणें विचलीत होऊं देता नये

इतिहासात अशाच प्रकारचीं वादळें या पूर्वी होऊन गेलेलीं आहेत, परंतु आज विसाव्या शतकात एकतंत्री हुकुमशाहीचा जसा उपद्रव होत आहे तसा पूर्वी नव्हता तशा प्रकारची, सर्वांना धक्का देण्याजोग्या विश्वव्यापी परिणाम घडवून आणणारी, आणि इतक्या अनेक चिंताजनक व प्रसंगीं अस्वस्थ करणाऱ्या प्रतिक्रिया निर्माण करणारी परिस्थिति कोणत्याहि उलथापालथीनें-फ्रेंच राज्य क्रांतीनें देखील, निर्माण केली न हती

रशिया व चीन यांच्या कम्युनिस्ट साम्राज्य वादाचें सर्वांना समान असलेलें संकट आपल्या सन्मुख उभे आहे केवळ लोकशाहीवादी पाश्चात्य राष्ट्रांना एकत्र आणल्यानेंच त्याच्या आवश्यक आणि स्पष्ट प्रतिकाराची योजना होऊं शकत नाहीं, तर ज्या सर्व मानवी सुधारणांना त्याच्यामुळें नाश होत आहे त्यांच्या मध्यें सुद्धां सहकार्य निर्माण करणें आवश्यक आहे

मूलत ज्याचे जीवनपंथ विभिन्न आहेत, अशा जनतांच्या मध्यें असल्या प्रकारचें सहकार्य घडवून आणण्याच्या मार्गात अडचणी असतात त्याचें एक खास आणि पोलवर रुजलेलें विशेष लक्षण आहे गेलीं तीनशें वर्षे युरोपमधील राष्ट्रांच्या स्पर्धा आणि त्यांचीं मर्ये त्यांचीनें परमावधीनें कडुतर होतीं, त्यांच्या मधल त्रिविध हितसंबंध दृष्टिकोनाच्या भिन्नतामुळे आणि परिणामीं निर्माण होणाऱ्या गैरसमजामुळें गुंतागुंतीचे झाल्ले होत -आणि आजहि ते तसेच आहेत ह्या स्पर्धांच्या जागीं सहकार्य आणि सुजाण विश्वास याची स्थापना करणें, तितकेसें सोपें नाहीं ही राष्ट्रीय परंपराच्या संघर्षांची खाई रुंद आहे परंतु शिक्षण विचार आणि मूल्यें यांच्या मूलभूत समानतेने त्यांच्यात समजूतदारपणा आला, वैरभाव नरमला आणि तडजोड व एकवाक्यता होणें आता तितकेसें दुष्कर राहिल नाहीं

समजूतदारपणा, आणि विभिन्न मानवी सुधारणांच्या कक्षेतील जनतांच्या मधील एकात्मता, यांच्या मार्गांतले अडथळे मूलतः अति मोठे असतात. जीवन मानातील नैतिक दर्जांच्या मध्यें वसणारी भिन्नता आहे, आणि सर्वांत अधिक म्हणजे,—विजय, पराभूतवाद आणि वांशिक उद्दामपणा यांच्या स्मृतीमुळें उद्भवणारी संतापाची भावनासुद्धा आहे. यांच्यामुळें ते अडथळे आणखीच वाढत असतात म्हणूनच, जर आपल्याला भिन्न दिशांकडे तोंड असलेल्या हितसंघात एक वाक्यता आणण्याच्या समस्येत, —(परोपरि हेंच सर्वांसी पुरेसें बिकट काम आहे,)— अधिक खोल आणि मूलभूत नैतिक गैरसमजुतींची गुंतागुंत आणखी भरीला करून घ्यावयाची नसेल, तर सर्वच दिशांनीं परस्परता, सहिष्णुता आणि संयम यांचा विकास आणि वापर करण्याचा असामान्य प्रयत्न आपल्याला करावा लागेल

दुसऱ्या सृष्टींच्या अस्तित्वामुळें, भिन्न सुधारणांच्या कक्षेतील मनुष्यांच्या मध्यें गैरसमज होण्याचा धोका सर्वांत मोठा असतो आणि म्हणूनच आपले हेतू दुसऱ्यांना कळण्या इतके सुस्पष्ट असण्यासाठीं, पहिली आवश्यकता म्हणजे त्यांच्या विषयीं आपण स्वतः च स्पष्ट असलें पाहिजे

सगळेच नोंद घ्यावी ही होय. गलिच्छ वस्तींनी वेढलेली ऐसपैस सुंदर बागा सुद्धा अस्वस्थता निर्माण करीत नाहीं, तर शेवटी ती असंतोषसुद्धा होत असते. तिसरें कारण, आर्थिक मदतीमुळें शांततेच्या ध्येयाची सेवा साधता येईल, या आशयाचें मूळ होय. एखादें स्वतंत्र राष्ट्र जितकें अधिक सामर्थ्यशाली बनेल, तितका त्याच्यावर आक्रमण होण्याचा संभव कमी, आणि म्हणूनच तितकाच युद्धाचा मुद्दा संभव कमी.

तथापि, आपण आपल्या दोस्तांना विकत घ्यावें ही, किंवा विकत घेण्याचा प्रयत्न करावा अशी, कोणतीहि स्पष्ट कल्पना आपल्याला न शिवू देण्याची खबरदारी आपण घेणें महत्वाचें आहे. कम्युनिस्ट प्रचारानें आशियाभर याच अन्वयार्थांची चिथावणी दिली आहे, त्याचा प्रचार खोटा पाडणें अत्यंत महत्वाचें आहे. पूर्वेला आमच्या मदतीनें हस्तकाच्या दर्जाला बसविता येणार नाहीं. पाश्चात्यांनी आपल्या प्रतिष्ठेचा अपमान केला किंवा आपल्या सचोटीचा विपरीत अर्थ केला, असें आमच्या या अशा समजुतीमुळें जर आशियावासीयांना वाटू लागलें, तर ती गोष्ट हास्यास्पद व तिरस्करणीय ठरेल.

त्याच प्रमाणें कम्युनिझमचें आवाहन फक्त भुकेलेल्या साठींच आहे, व त्यांचें भौतिक जीवन मान उंचावलें की तें आवाहन निष्फळ ठरेल, ही विचित्र कल्पना दखील आपण टाळलीच पाहिजे. माणसें इतकी काहीं साधी भोळी नसतात.

या मुद्यानें विवरण मात्र अत्यंत काळजीपूर्वक व्हायला पाहिजे. कारण त्याच्या बद्दल बरीच व्यापक गैर समजूत पसरलेली आहे. एकतंत्रतावादी हुकूमशाही लोकमताकडे कावेबाजपणाच्या किंवा भयाच्या नजरेनें बघत असते, आणि म्हणूनच त्यानें प्रचाराच्या पद्धती आणि साधनें यांचा विकास करण्यासाठी अमाप शक्ति, साधन संपत्ति, आणि विचार यांचें समर्पण केलें, याबद्दल आपल्याला नवल वाटायला नको. अर्थातच, आता पाश्चात्य देशांना त्यांचें मुख्य तंत्र चांगलेंच अवगत झालेलें आहे. अगडबंब असत्य, त्याची अविश्रांतपणें पद्धतशीर पुनरुक्ति, आणि मानसशास्त्रज्ञ ज्याला कल्पनांचें निर्बुद्ध साहचर्य म्हणतात, त्याचा दुरुपयोग हें तें तंत्र होय. अर्थात काहीं पाश्चात्य व्यापारी हें कल्पनांच्या निर्बुद्ध साहचर्यांचें तंत्र जाहिरातबाजी मध्यें वापरीत असतात. परंतु तें साधारणतः बरेंच बोथटलेलें तंत्र त्या ठिकाणीं निरुपद्रवी शान्त असतें. उदाहरणार्थ, एखादें मृदु पेय, किंवा एखादी

सिगारेट किंवा एखादी मोटार गाडी, याची जाहिरात करताना स्नानाच्या वेळचा पोशाख घातलेल्याएका सुंदर तरुणीचे चित्र, वापरण्यात येत असते. अर्थातच याचा अर्थ असा नव्हे की जर तुम्ही ते पेय, किंवा ती सिगारेट विकत घेतली तर तुम्हाला ती तरुणी मिळेल परंतु ती जाहिरात या आकर्षक समजनीयते बद्दल कसलाच इन्कार करीत नाही, आणि तिच्यामुळे मालाच्या विक्रयात मात्र नित्य वाढ होत असते.

तद्वतच कम्युनिस्ट प्रचारक लोकांच्या मनात रशियन धोरणाना किंवा रशियनांच्या आज्ञेबरहुकूम वागणाऱ्या लोकाना पाठिंबा देण्याच्या कल्पनाची सांगड अधिक वेतन पाद, किंवा कमी भाड्याची घरें, किंवा एखाद्या खऱ्या अगर काल्पनिक सामाजिक अन्यायाचा निषेध, याच्या सारख्या अगदींच भिन्न कल्पनाशी जुळवून देत असतात कधीं कधीं असें घडतें की, ते ज्या सत्य सामाजिक अन्यायाकडे अंगुलि निर्देश करीत असतात, ते ज्या गोष्टींचा निषेध करतात, त्यांतल्या काही खरोखरच दूषणास्पद असतात, आणि ते ज्या गोष्टींचें समर्थन करतात, त्यातल्या काहीं खरोखरच स्वय स्वीकारणीय असतात परंतु या गोष्टींच्या कारणाचा कम्युनिझमशीं किंवा सोवियत (किंवा चिनी कम्युनिस्ट) धोरणांशी मुतराम कालत्रयीं सुद्धा संबंध असत नाही, आणि कधीं कधीं तर त्याचा संबंध व्यस्त देखील असतो तरीसुद्धा एकत्र दिसलेल्या किंवा ऐकलेल्या दोन कल्पनाचें साहचर्य ( मग त्याचें संबंध तर्क विसंगत असले तरी देखील )—मानण्याच्या साधारण मानवी प्रवृत्तीचा ते परिणाम कारक दुरुपयोग करून घेत असतात

उदाहरणार्थ, हें कल्पनाच्या साहचर्याचें तंत्र बरीच वर्षे पाश्चात्य जगतामधील विशिष्ट सख्येतील लोकांच्या मनात पुरेपूरपणें असें भरवीत आलें की, कम्युनिझम म्हणजे एक प्रगतिकारक नवें आंदोलन होय परंतु अर्थातच, याच्या उलट तें आंदोलन, वस्तुत जुलूम जबरदस्ती इतकेंच प्रतिगामी आणि पातका इतकेंच पुरातन जुनेंपुराण आहे अगदीं अलीकडे बरीचशी राष्ट्रीय आंदोलनें कावीज करण्यासाठी, आणि कम्युनिझम साम्राज्यवादाचा विरोधक आहे, असें स्थानबद्धी आशियावासीयांच्या मनात भरविण्यासाठीं, हें तंत्र पुरेशाप्रमाणात उपयुक्त ठरलें आहे. परंतु या शतकामधला अत्यंत बहरी साम्राज्यवाद म्हणजेच कम्युनिझम, ही गोष्ट सत्य असल्याचें आतां दिसून येत आहे

यान कारणामुळें, जेथें उच्च जीवनमान आहे, किंवा भौतिक सुस्थिरसु परिस्थिती आहे, तेथें तुम्हाला कम्युनिझमचें भय नाहीं,—जेव्हां असें सहज लोकांत सुचविण्यात येतें, तेव्हां अशा सूचनांच्या बद्दल मी तुच्छतावादी बनत असतो कारण तें वाटतें तितकें सोपें सरळ नसतें

उदाहरणार्थ, फ्रान्स आणि इटाली यांच्यामधील ज्या जिल्ह्यांत धनार्जनाचें सरासरीनें मान अत्युच्च आहे, त्याच जिल्ह्यांमधून बहुधा कम्युनिस्टांना अत्यंत मोठ्या प्रमाणांत मतांची टक्केवारी मिळाली, असें दिसून आलें. समजा, उत्तर इटालीच्या पातळीवरून आशियावासीयांचें दरडोई भौतिक उत्पन्न वेळीच वाढविण्यावर, त्यांच्या कडून होणारा कम्युनिस्ट प्रचाराचा प्रतिवाद व प्रतिकार अवलंबून राहील, असें का रास्तपणेंच कुणाला गंभीरपणानें वाटतें ? बौद्धिक आणि नैतिक विचार एखाद्याच्या भौतिक जीवन मानाबरहुकूम कांहीं इतके बदलत नसतात

अर्थात्, पश्चिमेनें आशियाला आर्थिक सहाय्य पुरवूं नये, असें कांहीं मी सुचवीत नाहीं सहतच, मी अशा सहाय्यानें मोल मुद्दा कमी लेखीत नाहीं. याच्या उलट, अशा कार्यक्रमांनीं मला जागतिक राजकारणाच्या संपूर्ण क्षेत्रांत होणाऱ्या अत्यंत महत्वाच्या दूरगामी विकसनाच्यापैकीं एकाचें दर्शन होत असतें

मी मात्र निश्चीतपणें असें सुचवितो कीं, आपण आपण पश्चिमेचे लोक शीत युद्धाच्या हेतूसाठींच जर केवळ अशी साधन सामुग्रीची मदत करणार असलों, तर मात्र आपण कोणताहि चिरस्थायी सुपरिणाम संपादन करण्यात अयशस्वी होऊं, असा समज दिसतो तथापि, आपण जर ही मदत केवळ आशियावासी आणि अन्य शेजारी यांच्या बरोबर असणाऱ्या स्नेहाच्या नात्यानें मान्यता देण्याच्या दृष्टीनेंच करीत राहिलों, तर आपण राजकीय वातावरणात प्रगति करण्यात आणि मानव समाजाच्या कल्याणाला प्रोत्साहन देण्यात खचितच यशस्वी होऊं कारण सदिच्छा नेहमीच सफल धन्य असते

असें आर्थिक सहाय्य जरी महत्वाचें असलें, तरी हेंहि तितकेंच स्पष्ट देण्याजोगें आणि विचार करण्याजोगें आहे कीं, त्याचा उपयोग कम्युनिस्ट आपल्या प्रचाराची मूलभूत फळी म्हणून आशियाभर करीत असतात,— आणि सहस्रावधि आशियावासी त्याच्यावर विश्वास देखील ठेवीत असतात.

"पाश्चात्यांकडे दारिद्र्याशिवाय दुसरें कांहींहि नाहीं, तत्त्वज्ञानाचें नांवच सोडा, उघडे नळ टाकावेत त्यांनी, फाफ्युडांना कोकाकोला पाजणारे!"— असा प्रचार ते करीत असतात

या प्रचारामुळें आमच्या सहकार्याच्या कार्यक्रमाचा उपयोग, आमच्याच विरुद्ध पुराव्यादाखल करण्याचा प्रयत्न करण्यात येत असतो मध्यंतरी सोव्हियट राज्य संघ रशियानें मोठ्याप्रमाणात चीनच्या लाल प्रजासत्ताकाला आर्थिक आणि सैनिकी सहाय्य देत आहे, आणि त्याचे कम्युनिस्ट अनुयायी आशिया मधील स्वतंत्र देशांच्या अंतर्गत कलहना, संघर्षांनी शस्त्रें, आणि वाङ्मय यांचा पुरवठा आणि प्रचार करण्यावर आपलें लक्ष्य केंद्रित करीत आहेत आग्नेय आशियामधील कम्युनिस्टांचा विश्व विद्यार्थी आणि सांस्कृतिक मेळावा 'मानव जाति ऐक्य' विषयक आणि अन्य क्षेत्रांमधील अलीकडच्या "गंभीर" ग्रंथां पैकीं जे ग्रंथ आशिया आणि युरोप यांच्यामधील भागांत आणि आशियामधील विद्यार्थ्यांना परवडू शकतील अशा किंमतीत आहेत, ते बहुतेक कम्युनिस्ट प्रकाशन गृहांमधून बाहेर पडलेले आहेत

विश्वविद्यालयातून इतिहास, कायदा आणि तत्त्वज्ञान या विषयाचे अध्ययन करीत होते हिंदुस्थानसारख्या विशालभूखंडाच्या ताज्या इतिहासातली महत्त्वाची प्रकरणें म्हणजे याच विद्यार्थ्यांच्या पदव्युत्तर कर्तबगारीची कथा होय

आजसुद्धा आशिया आणि आफ्रिका यांच्यातील हजारों विद्यार्थी अमेरिका, कॅनडा, ब्रिटन आणि अन्य पाश्चात्य देशात, चतुर्थ कलमी योजना, फोल्ब्रो योजना, आणि सयुक्त राष्ट्र सघाचे कार्यक्रम, याच्यासारख्या योजनांच्या अन्वयें देण्यांत येणाऱ्या शिष्यवृत्तींच्या सहाय्यावर शिक्षण घेत आहेत तथापि, या शिष्यवृत्त्या आतां बहुतेक इंजिनियरींग, विज्ञान आणि अन्य तांत्रिक क्षेत्रामधील विद्यार्थी बऱ्याच मोठ्या प्रमाणात पटकावीत असतात, हें मात्र लक्षात घेण्याजोगें आहे अर्थातच हें शिक्षण आपल्यापरीनें अत्यत महत्त्वाचे आणि प्रशसनीय आहे परंतु राष्ट्रीय विकास आणि आतर्राष्ट्रीय सबध यांच्यासाठीं, शिक्षणाच्या विविध शाखांचे सापेक्ष महत्त्व जाणताना, या विनिमयाच्या कार्यक्रमामधील विषयांतर्गतींच्या समतोलपणावर, पाश्चात्यांच्या निर्णयाचा कांहींतरी परिणाम होत असतो कां ?

आशियाला जाणाऱ्या शिष्ट मडळांत अत्यत निपुणयमकला विशारद शानी डोकेबाजाच्या बरोबर, तितकेच सिद्धहस्त गेल्यास, व्यक्तिश मला तरी अधिक आवडेल

उदाहरणार्थ, विश्वविद्यालयांतील अध्यापक आणि इतिहास, राजनीति, तत्त्वज्ञान या विषयातील विद्यार्थी, याची देवाणघेवाण करण्याची, आणि सपादक व वृत्तपत्रकार यानी भेटी देण्याबद्दलची, जर तरतूद करण्यात आली, तर बरेंच कार्य साधूं शकेल पाश्चात्य यत्रें पाठविण्याचे सोडील, आमच्या पाश्चात्य सुधारणेला आकार देण्याच्या बाबत ज्याची अतर्दृष्टि कर्तृत्ववान ठरली, त्या थोर प्रमुख वक्तेत्याचे कांहीं ग्रथ आशियामधील विद्यार्थ्यांना तत्परतेनें स्वस्त किंमतीत देण्याची सोय सुलभ करून देणें सुद्धां महत्त्वाचे आहे, आणि तद्वतच, आमच्या शिक्षण केंद्रावर या पुरातन सुधारणांचें अध्ययन करण्यासाठीं, आकाशवाणी वरून सोयी उपलब्ध व्हाव्यात म्हणून, आशियामधील लोकांची मदत मिळविणें सुद्धां तितकेंच महत्त्वाचें आहे

माझ्यामतें, आशिया आणि पश्चिम याचा सास्कृतिक आणि मानवतावादी क्षेत्रामध्यें अधिक सपर्क होणें, मोठें महत्त्वाचें आहे, असें सिद्ध करता येईल

कोणत्याहि जनतेच्या लोकमताला आकार देण्याचें कार्य सरते शेवटी, तत्वज्ञानी, शिक्षक आणि लेखक हेच करीत असतात या क्षेत्रात पश्चिम आणि आशियाची पुनरुज्जीवित संस्कृति याच्या संबंधाचा प्रकार, एकाच बाजूनें प्रवेश असणाऱ्या वाटे सारखा उचितच होणार नाहीं याठिकाणी आपण स्वीकारू आणि देऊ देखील

या संदर्भांत, माझे मित्र आणि अमेरिकेमधले लेबानान सरकारचे परराष्ट्रीय वकील चार्लस मलीक—यांनी इव्हॅनस्टन यथें १९५४ च्या उन्हाळयात ' वर्ल्ड कौन्सिल ऑफ् चर्चेस "च्या बैठकीच्या वेळीं जें म्हटलें, त्याची माझ्यावर केव्हा छाप पडली होती —

" आशिया आणि आफ्रिका यांच्यामधील राजकीय, सामाजिक व आर्थिक समस्याची गुंतागुंत पाहिली, तर त्या बौद्धिक आणि आध्यात्मिक समस्याच्या मानानें फिक्या पडतात कारण आता काहींशा खात्रीनें आपण आत्तांच म्हणू शकतों कीं आज जर लोक अजून संपूर्ण स्वयं शासित नसतील, तर उद्या, किंवा कमी अधिक उशिरा ते होतीलच, आज जरी लोकाना आपली साधनसामुग्री संपूर्णत उपयोगात आणण्याची पूर्ण योग्यता नसली, तरी ती येण्याच्या मार्गावरच ते आहेत, आज जरी सामाजिक भेदाभेद आणि अन्याय अजून अस्तित्वामध्यें असले, तरी त्याच्यावर हल्ला चढविणें, ही आजची जाहीर युगप्रवृत्ति आहे या क्षेत्रात आपली वाटचाल यद्यपि थोडी फार मंद असली तरी ती पुढें चालू आहे"

" परंतु आशिया आणि आफ्रिका याच्या मनाचें आणि आत्म्याचें काय होणार ? हा एक प्रश्नच आहे हें देखील खरें नव्हे कीं, एकदा लोकानीं राजकीय स्वातंत्र्य संपादन केलें, एकदा त्यांनीं आर्थिक संपन्नावस्था प्राप्त करून घेतली, आणि एकदा त्यानीं सामाजिक न्याय अमलात आणला, कीं मग अध्यात्म स्वतःची काळजी घेऊ शकेल मनुष्याचें मन, चैतन्य, आत्मा आणि त्याच्या इच्छेचा मूलभूत कल, त्याच्या आर्थिक व सामाजिक अस्तित्वाच्या एका कार्यामधून निर्माण झाले आहेत व ते त्याचे दुय्यम आहेत, असा जो आजच्या युगाचा समज आहे, तो तर्कदृष्टया महान प्रमाद आहे "

विविध समाजपद्धतींच्या आणि मानवी सुधारणांच्यामध्यें समजसपणा निर्माण करण्याचा हा विषय संपविण्यापूर्वी, ज्याचा सदस्य होण्याचा सन्मान कॅनडाला मिळाला आहे, त्या राष्ट्रकुलाच्या या संबधात करता येण्याजोग्या अद्वितीय भूमिकेचा उल्लेख (फक्त उल्लेखच) मी करणार आहे ही एक शिथिल, परंतु जि हाळ्याचा सहवास असणारे सर्वच खंडामधील राष्ट्र–सदस्य असलेली संस्था आहे अशा संदेहाच्या आणि मनस्तापाच्या काळात पश्चिम आणि आशिया व आफ्रिका यांना सांधणारा एक समजसपणाचा पूल, म्हणून राष्ट्रकुलाचें महत्त्व अनन्य आहे असे पूल फारच थोडे असतील माझ्यामतें, प्रसंगाच्या ओघात राष्ट्रकुल संस्थेचें मूल्य आणि सामर्थ्य याचा विचार आंतर्राष्ट्रीय संबंधाच्या दृष्टीनें करणें योग्य होईल त्याचा ओघ मोठ्या प्रमाणात आवश्यकपणानें अचिल असलेल्या भावनेच्या पायावर स्थित असलेल्या वस्तुस्थितींमधून वाहत असतो राष्ट्रकुलाचा विकास गुलागुलीच्या यत्नात्मक यत्नेच्या दिशेनें होऊं लागला असता, तर आज जी आशियातील राष्ट्रें आणि युरोपियन वंशाच्या जनतांची राष्ट्रें हीं स्वेच्छेनें त्याचे सदस्य होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, आणि ती होण्याइतका विकास घडवून आणण्याची योग्यता आणि लवचिक शक्ति राष्ट्रकुलाच्या ठायीं आलली आहे, याची कल्पना आपल्याला करता आली नसती राष्ट्रकुलाचें सामर्थ्य, त्याच्या प्रत्येक सदस्याला, त्याच्या अन्य समासदांशीं असलेल्या संबंधाच्या संदर्भात अशा संस्थेच्या मूल्याला अचूकपणानें स्पष्ट नसलेली, परंतु मनःपूर्वक असणारी, मान्यता देण्यावर अवलंबून आहे त्याचप्रमाणें तें सामर्थ्य आम्हा सर्वांचा समावेश करणाऱ्या एका पद्धतीला टिकविण्याच्या समान आस्थेच्या मान्यतेंत आहे अशी मान्यता एका विशाल आंतर्राष्ट्रीय समाज व्यवस्थेचा चांगला मळकट पायासुद्धा होऊं शकेल

---

# ७ : लोकशाही आणि निर्णयाचें सामर्थ्य

आतापर्यंत आपण आमच्या पिढी पुढें उभ्या ठाकलेल्या जागतिक राजकारणांच्या समस्यांचें नवें प्रचंड प्रमाण विचारात घेतलें. तसें करताना बऱ्हंशी आपण आपल्या स्वत:च्या बाहेर नजर वळविली आणि बाह्य साधनाच्या दृष्टीनें, सामर्थ्याची, व तसेंच राष्ट्रीय सत्या, समाज व संघटना यांच्यापेक्षा विशाल स्वरुप असणाऱ्या संघटनाची, आणि शेवटीं मानवी सुधारणाच्या परस्पर संबंधाची चिकित्सा केली.

आमच्या आंतरराष्ट्रीय समस्यांच्या व्याप आणि प्रमाण, याचा जसा विस्तार झाला, तसेंच लोकशाही राज्यामध्यें परराष्ट्रीय धोरणासंबंधीं आवश्यक महत्त्वाचे निर्णय निश्चीत करण्यात भाग घेणाऱ्या लोकांच्या संख्येचें प्रमाण देखील वृद्धिंगत पावलें. कित्येकांच्या मतें ही एक निराशामय गुंतागुंत आहे. कारण प्रचंड बहुसंख्या अप्रत्यक्षपणानें आपल्या मतदानाच्या योगानें हे निर्णय घेत असते. आणखी, कांहीं व्यक्तिक लोक वृत्तपत्रें, आकाशवाणी, टेलेव्हिजन यांच्यासारख्या गैरसमज आणि अज्ञान दूर करूं शकणाऱ्या किंवा वाढवूं शकणाऱ्या, आणि लोकमतावर प्रभाव पाडणाऱ्या, साधनाच्या सहाय्यानें या कार्यात प्रत्यक्षपणानें हस्तक्षेप करीत असतात. त्याचप्रमाणें परराष्ट्रीय धोरणाचे दैनंदिन निर्णय आणि त्याची अंमलबजावणी करण्याच्या बाबतीत सुद्धा कायदे मंडळाची समिती, किंवा त्याचा व्यक्तिगत सदस्य, याचा हस्तक्षेप होत असतो. विशिष्ट प्रकारच्या लोकशाही राज्यकारभारामध्यें ही परंपरागत जबाबदारी मुख्यतः कार्यकारी मंडळाची असली तरी हा हस्तक्षेप वाढतच आहे.

परराष्ट्रीय मुत्सद्देगिरी आणि वाटाघाटी याच्या तंत्राच्या संबंधात, या गोष्टीचा उल्लेख मी आधीं केलेला आहेच. आता धोरण बनविण्याच्या संबंधात मी तिच्याविषयीं दोन शब्द सांगणार आहे

अर्थात् परराष्ट्रीय धोरणाचे निर्णय घेण्यासाठीं कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें सहभागी होण्याची सार्वत्रिक आवड, लोकशाही कार्य पद्धतीच्या स्वभावातच मूलत: असते. घडत आहे, तें योग्यच आहे. कारण आजकाल स्वतंत्र लोकशाही देशात, परराष्ट्रीय धोरणाचा हेतु सर्व नागरिकांच्या हित

संबंधाचें संरक्षण आणि प्रगति करण्याचा ठेवूनच नुसतें मागणार नाहीं, त्याचीं तत्त्वें आणि त्याच्या प्रमुख हालचाली यांची ओळख त्यांना करून देणें आणि त्यांची संमति मिळवणें, हें सुद्धा अवश्य असतें. त्या मानानें अगदीं अलीकडे पाश्चात्य समाजात सुद्धा, या क्षेत्रातील निर्णय नेहमी एकच राज्यकर्ता किंवा राज्यकर्त्या वर्गाचे मूठभर घटक घेत असत. शिवाय कधीं कधीं हीं धोरणें त्याच वर्गाच्या मूठभर लोकांच्या स्वार्थाच्या दृष्टीनेंच घेण्यात येत असत. पण आज सगळेंच कांहीं वेगळेंच आहे. आता आपण सर्वंचजण या बाबतीत काळजी वाहतो. आपण सर्वंचजण आता धनी आणि चाकर आहोंत. आपण सर्वंचजण आता निष्णात सुद्धा आहोंत !

परराष्ट्रीय धोरणाची अमल बजावणी करण्याच्या संबंधात, ज्यांना कायदे मंडळाच्या आणि लोकमनाच्या बौद्धिक आणि भावनाशील गुंतागुंतीच्या प्रभावाचा हस्तक्षेप होईल, असें भय आज वाटत आहे, आणि या बऱ्याच हस्तक्षेपांना तथाकथित दुराग्रह आणि असमंजस हेतू यांच्यामधून प्रेरणा मिळते, असें ज्यांना वाटत असतें, त्यांनीं मागील काळात अत्युच्च प्रमाणात सत्तेचें केंद्रीकरण झालेल्या राजेशाही किंवा मूठभर कंपूच्या अधिकारशाही सरकारांनीं, अनियंत्रीतपणें, घटनांवर नेहमी स्वार्थी व तत्त्व–शून्य प्रभाव कसा पाडलेला असे, याचें स्मरण करावें. आज भवंडं बहुमत किंवा सार्वत्रिक चिंतन्या यांचा परराष्ट्रीय धोरणावर ज्या पद्धतीनें प्रभाव पडत असतो, तसा प्रभाव अत्यंत विचारपूर्वक ठरविलेल्या परराष्ट्रीय धोरणावर राजवाड्यांत कृपापात्र असलेल्या एखाद्या दरबारी माणसाचा, किंवा एखाद्या दरबारी विदुषकाचा देखील, पडत असे. त्यामुळें चांगलीं सुद्धा धोरणें अमलात आणण्यात अडथळे निर्माण होत, किंवा त्यांत बदल करून गोंधळ होत असे. तथापि, राजवाड्यातल्या तसल्या कारस्थानाला आळा घालण्याचें एखाद्या राजाच्या शहाण्या व संयमी परराष्ट्रीय अमात्यानें त्याकाळीं योजलेले प्रतिकारात्मक उपाय मात्र अधिक सहज आणि अधिक प्रभावी असत. परंतु त्यात स्वतःवर ओढवून घेणाऱ्या शारीरिक संकटाच्या एका गुंतागुंतीचा धोका सुद्धां तो पत्करीत असे. आजच्या कोणत्याहि राज्य–सचिवाला किंवा परराष्ट्रीय मंत्र्याला एखाद्या रकान भरू पत्रकाराविरुद्ध, किंवा आकाशवाणीवरील वक्त्या विरुद्ध, अगर कायदे–मंडळातल्या पोट समिती विरुद्ध तर्से कांही करतां येत नाहीं आणि तसा प्रकारचा धोका पत्करावा लागत नाहीं !

परराष्ट्रीय धोरणाचे नियंत्रण आणि त्याचा अंमल करण्याच्या संबंधात, लोकशाही अधिक संख्येंत आणि अधिक विविध हस्तक्षेप करूं शकेल, एकतंत्री राज्य-पद्धति अधिक गूढतम आणि बिकट कारस्थानें खचितच घडवूं शकते, त्याची साक्ष मास्कोनें पटविलेली आहेच. कायदे मंडळाच्या समितीला जें धोरण शहाणपणाचें आणि देशभक्तीचें वाटतें, त्याच्या पासून जर एखादा राज्य-सचिव "मार्गच्युत" झाला, असें जर समितीला वाटलें, तर त्यामुळें तो फार करून अधिकारभ्रष्ट होईल आणि त्याची प्रतिष्ठा कांहींशी कमी होईल. परंतु एखादा परराष्ट्रांतला प्रतिनिधी जर अशा शृंगापत्तीत सांपडला, आणि एका दोघा, नव्हे तीन हुकूमशहांच्या इच्छेविपरीत वागला, तर त्याला स्वतःला आपली प्रतिष्ठा गमावूनच निभावतां येणार नाहीं; त्याला त्यापेक्षां देखील कांहींतरी अधिक गमवावें लागेल.

तथापि, आज माहितगार, गैर माहितगार आणि विपरीत माहितगार, अशा लक्षावधी लोकांच्या प्रवृत्ती आणि मतें, कधींकधीं त्यांच्यामुळें निराधार चिंता निर्माण होत असल्या तरीसुद्धां, धोरणें घडविण्याच्या बाबतींत महत्त्वाचा भाग घेत असतात, ही अगदीं निर्विवाद वस्तुस्थिति आहे.

कधींकधीं आणखी एक युक्तिवाद करण्यांत येतो. ज्यांच्या हातीं ही अंतिम सत्ता असते, त्या जनसमुदायाला, वेळ मारून नेणाऱ्या प्रासंगिक निर्णयापेक्षां, अधिक आवश्यक असणारे शहाणपणाचे निर्णय घेणें जमत नाहीं. त्यांना ती बिकट कामगिरी आणि जबाबदारी परकरणें विशेषें करून त्रासदायक व कटीण वाटत असते. खरोखरच, या बाबतींत लोकशाहीची अपूर्णता दर्शविणारी पुष्कळशीं उदाहरणें इतिहासांत दाखवून देतां येण्यासारखीं आहेत.

तेवीसशें वर्षांपूर्वी ग्रीसच्या मर्यादित परंतु विशुद्ध लोकशाहींत नेते आणि जनता यांचे संबंध समोरासमोरचे असत. आज टेलेव्हिजनमुळें ते तसे पुन्हां निर्माण होत आहेत. कधीं कधीं त्याचे परिणाम अनिश्चित असत. तथापि प्रत्यक्ष अशा प्रकारचा संबंध त्याकाळीं सुद्धां, (आज जसें घडतें त्या प्रमाणें), नेहमीं मतें बनविण्याच्या दृष्टीनें उपयुक्त ठरत नसे. मॅसिडोनच्या फिलिपनें निर्माण केलेल्या धोक्याविरुद्ध अथेन्सच्या लोकसंघटनेला जागृत करण्याचा वृथा प्रयत्न डेमास्थेनिसनें केला होता, परंतु त्याच्या पदरांत अपयश पडलें होतें. १९३० मध्यें सर विन्स्टन चर्चिल यांनी नाझींच्या धोक्याबद्दल ब्रिटिश

पार्लमेंटला जागे करण्याचा प्रयत्न केला आणि त्यात त्यांना अपयश आले, या घटनेमुळें त्याचीच पुनस्मृति होऊ शकेल

क्रिओनने खिस्ताब्दपूर्व ४२७ वर्षे आधीं सदस्यांपुढें काय सांगितलें होतें यांचें वर्णन थुसिडायडेज करतो,—"लोकशाही ही साम्राज्य स्थापन करण्यास नालायक असते, याचें मला अनेकदा यापूर्वी प्रत्यंतर आलें आहे" या नालायकीचे कारण सुचवितांना क्लिओन असें म्हणतो कीं, सभेच्या सदस्यांना इतर लोक त्यांच्या सारखे नाहींत, या गोष्टीचें विस्मरण होतें "या बाबतींत अत्यंत भयावह प्रकार म्हणजे धोरणात सतत होणारें परिवर्तन, आणि पाठीशी सत्ता नसलेल्या चांगल्या कायद्यापेक्षा कधींहि न बदलणारे वाईट कायदे एखाद्या शहराला हितावह ठरतात, या वस्तुस्थितीचें दिसून येणारें अज्ञान" असें विधान तो करतो क्लिओन आपल्या जनतेचें तिच्या तोंडावरच खालील भाषेत वर्णन करतो

"या बाबतींत सर्वस्वी तुमचाच दोष आहे तुम्हींच हे वादविवाद सुरू करण्याइतके मूर्ख बनलात एखादें दृश्य बघायला जावें, त्याप्रमाणें तुम्ही हें वक्तृत्व ऐकायला जातां तुम्ही ऐकीव माहितीवरून गोष्टींचा स्वरूपणा ठरवितां, आणि एखाद्या योजनेचा व्यावहारिकपणा तिचें समर्थन करणाऱ्यांच्या शब्दचातुर्यावरून ठरवितां गतगोष्टींच्या स्वरूपणासाठी तुम्ही तुमच्या डोळ्यांपेक्षा तुमच्या कानावर विश्वास ठेवतां, कुठल्यातरी हुशार टीकाकाराच्या शब्दांवर विश्वास ठेवीत असतां"

या भाषणांत अगदीं आजचा सूर वाटतो मात्र आजचे राजनीति निपुण आपल्या मतदारांच्या तोंडावर असें कधींच सांगायला धजणार नाहींत

सत्तावीस शतकांनंतर किंवा अशाच कांहींशा उशिरा, श्री वाल्टर लिपमन यांनीं, सरकारी धोरण बनविणाऱ्यांना ज्या परस्परावलंबी निवडींच्या मालिकेला तोंड द्यावें लागतें,-त्या "समीकरणाच्या प्रश्नाचें" पृथक्करण करतांना असा निष्कर्ष काढला कीं—

'अशा प्रकारच्या विकट आणि मृदू निवडी सन्मुख उभ्या असतांना, लोकशाही सरकारांची सामान्य प्रवृत्ति, मोठ्या प्रमाणातील मतदारांच्या सख्येला दूर करण्याची असते मतदारांचा दाब सामान्यत समीकरणाच्या मृदू बाजू सबधींच असतो"

यावरून श्री लिपमन असा निराशादायक निष्कर्ष काढतात की, " एखाद्या लोकशाहीवादी राजनीति निपुणाला एखादी चूक गोष्ट, ती लोकमताच्या दृष्टीनें खरी व योग्य गोष्ट ठरण्याच्या आधींच, स्वीकारणें अधिक सुरक्षितपणाचें वाटत असतें, आणि घटनाच्या बरोबर जरी त्याचे पाऊल पडत नसलें, तरी लोकमताच्या बरोबर असण्याचा देखील मोह त्याला वाटत असतो."

सरकारवर लोकमताचें सामुदायिक दडपण आणण्याच्या या प्रवृत्तीवर, आणि धोरणाची उद्दिष्टें साध्य करण्यासाठीं असें दडपण उपयोगात आणण्याच्या सामुदायिक हेतूच्या विपरीत लक्षणावर, श्री लिपमन यांच्या दोषारोपण करण्याचा हेतू दिसतो त्यांच्या मतें,–" ज्या समुदायाला माहिती दिलीच पाहिजे आणि युक्तिवाद ऐकवले पाहिजेत, तो जेव्हां अवाढव्य आणि सर्मिश्र असतो, तेव्हा लोकमत कमी वास्तववादी बनते " यामुळेंच परस्पर विसंगत आणि गोंधळाच्या स्वरूपाचीं दडपणें यद्वृत्ती निर्माण होत असतात, असें त्यांचें मत आहे त्याशिवाय हीं दडपणें मुद्दां अधिकाधिक विकारी, दुराग्रही, आणि अरेरावी स्वरूपाची बनत चाल्लीं आहेत श्री लिपमन यांच्यामतें, " जेथें सामुदायिक मत अरेराव बनतें, तेथें सत्तेचें खरें कार्य विस्कळित आणि दुबळें बनतें "

श्री लिपमन यांच्या या विषयावरील संपूर्ण सिद्धांतावरोबर सहमत होण्याची कांहीं आवश्यकता नाहीं प्रत्यक्ष धोरण ठरविण्याची आणि नियमन करण्याची ही लोकांची वाढती प्रवृत्ति खरोखरच कधी संकटकारक होऊं शकते, याच्यावर श्री लिपमन यांनीं बोट ठेवलें, तें मात्र सर्वस्वीमान्य केलें पाहिजे कारण, असें नियमन, जर जबाबदारी व संयम सांभाळून उपयोगात आणलें नाहीं, तर मात्र निःसंशय नैतिक आणि बौद्धिक दृष्ट्या पतित बनू शकेल इतिहासांत याचा अनुभव सर्वत्र विखुरलेला आहे मोठाल्या समाजांत अंतर्गत किंवा बाहेरून उलथापालथ होण्याचें परिणामकारक निमित्त हेंच घडत आलें

गेल्या पन्नास वर्षांतील आंतर्राष्ट्रीय राजकारणाचे एक दोन पैलू जर व्यापण पाहिलें, तर आपल्याला हें संकट समजण्यासाठीं मदत होऊं शकेल हें शिकून घेण्याचा एक मार्ग म्हणजे स्वतः प्रयोग आणि प्रमाद करणें होय आम्हीं उभयतांचे मुबले ढीग पाडून ठेवलेले आहेत परंतु प्रयोग करून पाहणें,

ही जरी शहाणपणाची पायवाट असली, तरी तिच्याबद्दल खात्री देतां येत नाहीं. याशिवाय आपल्या भोंवतीं किती काय घडत आहे, त्याचे मोजमाप जागरूकपणाची तीव्रता आणि योग्यता यावरून केलेलें बरें या ठिकाणीं तुम्हाला मी नेपोलियनच्या एका मार्मिक उत्तराची आठवण करून देत आहे. एका अधिकाऱ्याला बढती देण्याची शिफारस करताना, कुणीतरी त्याला सांगितलें कीं, तो अधिकारी अनेक बिकट मोहीमातून निभावला होता नेपोलियननें तेव्हा उत्तर दिलें म्हणतात, " माझा घोडा तर त्याहिपेक्षां आणखी मोठ्या मोहिमातून पार पडलला आहे " महान फ्रेडरिकनें आपल्या सेनानींना शोभक बुद्धीनें प्रश्न केला होता, " तुम्हीं जर आपल्या अनुभवाविषयीं अंतर्मुख होणार नसाल, तर मग त्याचा उपयोग तरी काय ? "

आपण जर आपल्या अनुभवाविषयी अंतर्मुख झालों, आणि त्याच्यापासून लाभ घेतों म्हटलें, तर त्यासंबंधातली पहिली पायरी म्हणजे त्याचें पुनर्स्मरण करणें होय एका गोष्टीच्या बाबतींत मी तसें करणार आहे

तीस वर्षांपूर्वी अमेरिकेमधील पुष्कळ लोक अलिप्ततावादी विचारसरणीचे होते अमेरिकेतल बरेच लोक–बहुधा, बहुसंख्य जनता युरोपात काय चाललें याबद्दल अति दूरतेची भावना बाळगीत, आणि या आपल्या परकेपणाच्या भावनेबद्दल त्याना जरा देखील दु:ख होत नसे त्या अतिदूर घडणाऱ्या भानगडींशी आपल्या दैवाची गुतागुत होण्याबाबत, ते बेफिकीर नव्हते तरी पण उघडपणें त्याना त्याची जराशुद्धा जाणीव नव्हती

कॅनडामधले लोक अलिप्ततावादापासून तसे काहीं अलिप्त नव्हते तरी पण आपला इतिहास आणि आपली परंपरा यांच्यामुळे स्वत:ला युरोपपासून इतके अलिप्त व दूर मानीत नव्हते याच प्रवृत्तीच्या परिणामानें, ( आणि कारणानें सुद्धां ! ) कॅनडानें १९१४ मध्यें आणि १९३९ मध्यें युद्धात प्रवेश केला

तथापि, वीस आणि तीस या दशकात, कॅनडाच्या सरकाराचा, आवश्यकपणानें, युरोपियन गुतागुतीपासून अलिप्त राहण्याचा हेतु होता याचें कारण कॅनडामधील विविध मनोवृत्तीच्या लोकाच्या मध्यें–युरोपियन प्रश्नाच्या विषयीं चूक बाजू आणि न्याय्य बाजू कोणती हे ठरविण्याचे बाबतीत, आणि त्याचा आमच्याशी असणाऱ्या संबंधाच्या बाबतीत,—उघड उघड दोन तट..

पडलेले होते त्याचप्रमाणें, अमेरिकन लोकाप्रमाणें कांहीं कॅनेडियन लोकाना, —"महासागराचें संरक्षण आपल्याला पुरेसें होईल आणि कोणत्याहि बाह्य युरोपियन संघर्षापासून आपण सुरक्षित व अस्पृष्ट राहू शकू," असा संभ्रम वाटत होता परंतु १९३० च्या काळामध्ये कॅनेडियन सरकारानीं युरोपमधल्या राजकीय व सुरक्षा विषयक जबाबदाऱ्या, किंवा जुन्या राष्ट्र संघातली जबाबदारी स्वीकारण्याचें टाळलें, याचें कारण येगळेंच आहे युद्ध उद्भवलें तर भविष्य काळातील सैनिकी अभिवचनें पाळावीं लागतील, हें, त्याचें कारण नसून, गुळमुळीत सर्व साधारण स्वरूपाच्या मत प्रदर्शना व्यतिरिक्त जर काहीं निःसंदिग्ध धोरण प्रगट केलें, तर तात्काळ स्वदेशात घरगुती राजकारणात अडचणीची परिस्थिति उत्पन्न होईल, याची जाणीव त्याना होती

दुसऱ्या विश्वयुद्धाच्या आधीच्या दशकात उत्तर अमेरिका जागतिक राजकारणात परिणाम शून्यतेने वागत होती त्याचें एक कारण सुरक्षितपणाची खोटी जाणीव, अथवा उघड मतवैचित्र्यामुळें आपातत निर्माण झालेला दुबळेपणा असेल, परंतु युरोपमधल्या लोकसत्ताची कारकीर्द देखील तशी श्रेयस्कर न हती उलट त्यापेक्षाहि अधिक कमी प्रतीची होती सफटाच्या इतक्या सन्निध असून सुद्धा त्यानीं तिकडे दुर्लक्ष केलें बऱ्याच देशात या दुर्लक्षामुळें, इच्छा शक्तीना एक प्रकारचा पक्षघात झाला आणि त्याचा सर्वनाश करणारा परिणाम होके फिरवून घेण्यात व चुकीचीं धोरणें ठरविण्यात झाला बौद्धिक प्रमाद आणि योग्यतेचा अभाव यानीं अर्थातच, आपली भूमिका यथायोग्य पार पाडली परंतु माझ्यामतें, एक प्रकारचें नैतिक अधत्व मूलत या नालकेपणाला जबाबदार आहे शांततेत, तद्वतच युद्धात, विजय मिळविण्यासाठीं कधीं कधीं धोका पत्करण्याची, स्वेच्छेची तयारी आवश्यक असते मात्र या गोष्टीची लोकाना तितकिशी जाणीव न ह्ती, हें कांहीं त्याचें कारण न हे, परंतु आवश्य कता असो, अगर नसो, अशा वृत्तीसाठीं अवश्यपणें लागणाऱ्या जबाबदाऱ्या स्वीकारण्यास आणि स्वार्थत्याग करण्यास लोक स्वेच्छेनें अनुकूल नव्हते

पाश्चात्य लोकसत्ता १९३० च्या काळात अधोगत अवस्थेच्या अंतिम टोकाला जाऊन पोहोचल्या होत्या, तरी त्याचा सजग, जरासुद्धां किंवा सर्वस्वी, त्याच्या देशातील राजकीय रचना अथवा परदेशामधील मुत्सद्दीपणाच्या पद्धती

याच्याशीं पोंचत न हता, किंवा सापेक्षत, अल्प प्रमाणात सुद्धां ज्ञानाशी किंवा बौद्धिक पणाशी त्याचा संबंध नव्हता तर त्या अधोगतीच्या शेवटच्या टोंकाचा निर्देश कांहींसा समाजाच्या आणि त्यांच्या धनकाच्या नैतिक दिवाळखोरीपेक्षा देखील अधिक अशा दुखरयेकडे करण्यात येत होता

परराष्ट्रीय संबंध आणि अंतर्गत कारभार याच्या बाबतीत सुद्धा १९३० च्या कालखंडानें अधोबिंदु गाठला होता तंत्र दृष्टया अत्यंत मोठी प्रगति झाल्ली होती परंतु एखादा समाज तंत्र ज्ञानाच्या क्षेत्रात अत्यंत पुढारलेला आणि अन्य क्षत्रात मागासलेला असू शकतो तेंहा आल्ली ती मंदी नि:बळ, समृद्ध साधन संपत्तीच्या मध्यान, बेकार आणि भुकेल्या लोकाच्या अपमानास्पद विरोधाभासात तंत्रज्ञानामुळें खचित आलेली न'हती तिनें आमच्या समाजातील नैतिक ज्ञान आणि सामाजिक हेतु याच्या अपयशाचें उदाहरण दाखवून दिलें, असें मला सुचवावयाचें आहे कोणत्याहि राष्ट्राची अत्यंत महत्त्वाची साधन संपत्ति म्हणजे माणसें, आणि त्यांचें हित हाच आर्थिक कार्य पद्धतीचा हेतु ! परंतु हें बहुतेक सर्वजण विसरून गेले असेंच दिसून आलें

त्यानंतर क्रूर, पशुवत, परंतु मुक्तिदायक अनुभव आला तिशाच्या साला पासून सुरू झालेल्या दशकाच्या शेवटीं, सर्वांना मागे सारणाऱ्या आणि सन्म सामाजिक हेतूच्या एका घडामोडीनें, सरकाराना आणि लोकांना एक अद्दल घडविणारी शिकवणूक मिळाली कीं कोणतेंहि उद्दिष्ट जर शारिरीक दृष्टया शक्य प्राय आणि भावनेच्या दृष्टीनें इप्सित असलें, तर तें समाजांना आर्थिक व राजकीय दृष्टया सुद्धां शक्य असतें (हा सामाजिक हेतु सुद्धा एका युद्धातून प्रगट झाला, आणि तें युद्ध कांहीं वर्षें आधीं लोकशाही सत्तांना खचितच थांबवतां येणें शक्य होतें )

मी १९३० मधील लोकशाही समाजांची जीं दृष्कृत्यें उकरून काढीत आहे, त्यांचें वर्णन परराष्ट्रीय धोरणात दुसऱ्यांच्याकडे दुय्यम स्थान आणि स्वदेशांत चौफेर मंदीची थाप, असें संक्षपानें करतां येईल तसें करण्यात माझा हेतु असें दाखवून देण्याचा आहे कीं, अंतर्गत किंवा आंतर्राष्ट्रीय राजकारणात किंवा पद्धतींच्या चांगल्या निर्णया बाबत किंवा ध्येयाची दिशा निर्दिष्ट करण्याच्या ठाम समजुतीबाबत, कोणत्याहि परिमाणात लोकशाही हमी होऊ शकत नाही

तद्वतच, राष्ट्राच्या अत्युत्कृष्ट हितसंबंधाच्या दृष्टीनें जर एखाद्या सरकारी चेरकानें स्वत चे निर्णय घेतलेले असतील, तर त्याच्या विपरीत त्यानें वागावें, किंवा वागावें, असा आग्रह लोकशाही सरकारचे सिद्धांत अगर व्यवहार यांच्यात कुठें सुद्धा आढळत नसतो “राजनीति म्हणजे संभाव्यतेची कला,” असें म्हणण्यात येतें, आणि म्हणूनच राजकारणात गुरफटलेल्या राजकारणी व्यक्तीनें एखाद्या गोष्टी संबंधी निर्णय घेण्यापूर्वी, ती लोकांना कितपत मान्य होईल, याचाहि अंदाज बांधणें, समंजसपणाचें आणि उपयुक्त ठरतें, नव्हे तें वरोवरच अपरिहार्य असतें, सामान्यतः ती गोष्ट लोकांपुढें कशी व केव्हा मांडावी, याबद्दल त्याचें तो ठरवील, परंतु सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार करून राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें घेतलेल्या आपल्या अत्युत्कृष्ट निर्णयाच्या विरुद्ध वागणें, हें मात्र वेगळें असतें. हें असें वागणें, म्हणजे एक प्रकारें विश्वासघात करणेंच होय

लोकशाहीचें आवश्यक राजकीय तत्व जबाबदार सरकार असतें, आणि जर या सरकारच्या रचेचा कारभार त्याच्या पसंतीला उतरला नाही, तर मतदारांनी त्याला अधिकारांवरून पदच्युत करण्याची तरतूद असते ही तरतूद, इतिहासाच्या लघुतम काल खंडाच्या दृष्टीनें सुद्धा खोट्या ठरलेल्या समजूतीवर, म्हणजे —बहुमत प्रत्येक प्रश्नाच्या बाबतीत खरें असतें, या असत्य कल्पनेवर कोणत्याहि अर्थी आधारलेली नाही चांगल्या स्वयपाकाच्या रुचीबद्दल तज्ञ निर्णय देणारे लोक भोजनानीत पगतीत बसलेले असतात, तो निर्णय बल्लवाचार्यांनी घेऊन चालत नसते, अशा निर्दोष सिद्धांतावर तिची उभारणी केलेली आहे

माझ्या माहिती प्रमाणें, उपस्थित होणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचा निर्णय घेताना सरकारनें बहुमताचा मागोवा घेतला पाहिजे पण ही तरतूद, शहर सभांच्या पातळीवरील घटनांच्या व्यतिरिक्त, कोणत्याहि लोकशाहीवादी घटनांच्यामध्यें आढळणार नाही याच्या उलट अशी तरतूद केलेली असते की, सरकार हें कायदेमंडळाला जबाबदार आहे, आणि विशिष्ट वर्षांच्या कालमर्यादेनंतर प्रत्यक्ष मतदार संघांना जबाबदार आहे मधल्या काळात बहुमताच्या संमतीचा हिशोब, जरी सतत सरकारला सतावीत असला व त्याला कारभार करणें असह्य करू पाहत असला, तरी सरकारांनी या अशा क्षणिक क्षोभांना मान तुकविणारी, किंवा एखाद्या प्रश्नावर झालेल्या सार्वजनिक मतप्रदर्शनाला मान

देण्याची, किंवा लोकमताच्या दडपणानें आपला मार्ग सोडण्याची गरज नाहीं जो मार्ग चुकीचा असल्याचें त्याना माहिती आहे, त्याला अनुसरण्याचें कोणतेंहि राजकीय अथवा घटनात्मक बंधन त्याच्यावर नसतें

माझ्या मतें, लोकशाहीच्या अत्यन्त श्रेष्ठ व निस्सीम सेवकांत एडमंड बर्क याची गणना व्हावी त्याना त्याच्या मतदार संघान व्यक्तीगत प्रश्नांच्या बाबतीत, आपल्या मताच्या स्वाधीन घरण्याचा प्रयत्न सदस्यत्वाच्या मुदतीत करून पाहिला होता त्याप्रसंगीं ब्रिस्टोल्मधील गिल्डहॉल्पुढें त्यानीं मतदाराना ज्या शब्दात फटकारलें, त्याची आठवण पुन्हा आता करणें उचित होईल

"...मी तुमचे आदेश पाळले नाहींत न हे,–मी सत्य आणि निसर्ग याच्या आदेशानां अनुसरलों, आणि तुमच्या मताच्या विरोधात, तुमच्या हिताचें सरक्षण करून स्वत शीं सुसगत राहिलों तुमचा प्रतिनिधी होण्याच्या योग्यतेची व्यक्ति स्थिर वृत्तीची असणें आवश्यक आहे. तरीसुद्धा मला तुमचीं मतें विचारात घ्यायला पाहिजेत, परतु मानतर पाच वर्षांनीं जीं तुमची आणि माझीं मतें आवश्यकपणें असतील, त्याच मताचा मी विचार करीन. आज जो अचानक मताचा लखलखाट पडलेला आहे, त्यानें मी दिपून जाणार नाहीं. तुम्हीं मला माझ्या जागीं इतराच्या प्रमाणें निवडून दिलें, तें मी राज्याचा आधारस्तभ व्हावा म्हणून, केवळ इमारतीच्या वरच्या टोकावरला वात-कुक्कुट म्हणून नव्हें ! तुम्ही मला वर चढवलें, तें वारा वाहील तसा हलकटाप्रमाणें पाठ फिरवायला, आणि सर्व दिशाकडे तोंड फिरवून, वाऱ्याच्या प्रत्येक झोताची दखल घ्यायला, एखाद्या वात कुक्कुटासारखा माझा उपयोग करून घेण्यासाठीं न हें "—

ही घटना १७८० मधली आहे त्यानीं आपल्या मतदाराना त्याच्या आधींच सहा वर्षांपूर्वी, पार्लमेंटचा एक सदस्य या नात्यानें आपलें कर्तव्य कोणतें, यासबधीं आपली कल्पना सागून टाकली होती, आणि त्याना इशारा दिलेला होता माझ्या मतें त्यांची कल्पना अत्यत निरोगी आहे ऐका त्यांची कल्पना :—

"—सद्गृहस्थहो, एखाद्या प्रतिनिधीला आपल्या मतदाराशी अत्यत काटेकोर ऐक्य, अत्यत निकटचें सादृश्य, आणि अत्यत मनमोकळें

दळणवळण, राखता आलें तर, खचित ही एक सौख्यप्रद आणि गौरवास्पद गोष्ट होऊं शकेल त्याच्यावर त्याच्या इच्छांचे मोठं दडपण पडलें पाहिजे, त्यानें त्याच्या मताला मोठा मान दिला पाहिजे, त्यानें त्याच्या व्यवहाराकडे अनिरत लक्ष दिलें पाहिजे त्याच्या विश्रान्त्याखाठीं, त्याच्या आनंदासाठीं, त्याच्या समाधानासाठीं, आपला विसांवा, आनंद आणि समाधान याच्यावर पाणी सोडणें, हें त्याचें कर्तव्य होय आणि सरतेशेवटीं म्हणजे, नित्य आणि सर्वच प्रसंगीं त्यानें स्वहिता पेक्षा त्याच्या हिताचा विचार आधीं केला पाहिजे

"—परंतु त्यानें आपलें नि पक्ष मत, आपला प्रगल्भ निर्णय, आपली प्राजळ विवेकबुद्धि, यांचा मात्र तुमच्यासाठीं, कोणत्याहि व्यक्तीसाठीं, किंवा कोणत्याहि व्यक्तींच्या संघटनेसाठीं, त्याग करतां कामा नये . .. . ..या गोष्टी काहीं त्यानें तुमच्या कृपेमुळें,–किंवा कायद्याच्या अगर घटनेच्या अनुग्रहामुळें प्राप्त करून घेतलेल्या नसतात या गोष्टी म्हणजे दैवी देणग्या आहेत, आणि त्यानें जर त्याचा दुरुपयोग केला, तर त्याबद्दल त्याला गंभीर प्रायश्चित्त भोगावें लागेल तुमचा प्रतिनिधि केवळ त्याच्या उद्योगाबद्दलच तुमचा ऋणाईत नाहीं, तर त्याचा निर्णय देतील, तुम्हीं त्याला दिलेलें ऋणच आहे म्हणून तुमच्या मतापुढें जर तो आपल्या निर्णयाचें बलिदान करील, तर तो तुमची सेवा करीत नाहीं तो तुमचा विश्वास घात करीत आहे "

कायदेमंडळाच्या सदस्यांनीं स्वतःला आपल्या मतदाराचे केवळ हस्तक मानून, स्थानिक गैरसमजाचा प्रतिध्वनि कायदेमंडळांत उमटविण्यास कटिबद्ध असावें, किंवा स्थानिक हितसंबंधाच्या रक्षणासाठीं लॉबीमधून आलेल्या दडपणामुळें मत द्यावें, हा सिद्धांत बर्कला खचितच मान्य नव्हता त्यांनी मेधुर्यतपणानें आपल्या मतदाराना बजावलें होतें :

"पार्लमेंट म्हणजे एका राष्ट्राचें एकाच हिताखाठीं म्हणजे पूर्णाच्या हितासाठीं वादविवादानें निर्णय घेणारे मंडळ होय तेथें स्थानिक हेतु व स्थानिक गैरसमज याचें मार्गदर्शन असू नये, तर पूर्णाच्या सर्व साधारण बुद्धीनुरा निश्चय झालेलें सार्वत्रिक क्षेम तेथें मार्गदर्शनार्थ असावें, तुम्हीं एक सदस्य निवडून दिला, हें खरें आहे परंतु एकदां तुम्हीं त्याला निवडून

दिल्यावर, तो काहीं नुसता ब्रिस्टोलचाच सदस्य उरत नाहीं तो मग पार्लमेंटचा सदस्य बनतो जर स्थानिक मतदारानीं उर्वरित समाजाच्या त्यांच्याहुन्या कल्याणाला विरोधी ठरणारें मत घाईघाईनें बनविलें, किंवा त्याला विरोधी स्वार्थी दृष्टि स्वीकारली, तर त्याची अमल बजावणी करण्याच्या कोणत्याहि प्रयत्नापासून, तेथल्या सदस्यानें इतराच्या प्रमाणेंच, अत्यत दूर राहिलें पाहिजे ”

आता १९५५ मध्यें मुद्दा हा एक परिपूर्ण असा सल्ला वाटेल बर्कचे हे शब्द म्हणजे कोणत्याहि लोकशाही समाजाची राजकीय प्रकृति निकोप ठेवण्यासाठीं नेहमींच अत्यावश्यक असणारें अनुपानपत्रक होय अशा समाजाचें मूलभूत घटक त्याची राजकीय पद्धति किंवा घटनात्मक सागाडा नसून त्याच्या मधील व्यक्तींचे चारित्र्य हेंच होय आणि नेहमीं तेंच राहत जाणार बर्क यानीं आपल्या मतदाराना जें ऐकविलें, तेंच एका अमेरिकनानें अत्यत संक्षेपानें सुनावलें होतें ' राष्ट्राध्यक्ष होण्यापेक्षा मी सत्याचरणी होईन '

मनुष्याच्या वैयक्तिक चारित्र्यावर भर देऊन, लोकशाही कार्यप्रवण करण्याची, त्याची निर्धारात्मक कामगिरी सागताना, माझा हेतु अर्थातच घटनात्मक उपाय आणि राजकीय सस्था याचे मूल्य उणें करण्याचा नाहीं अशा सस्थाचें मूल्य नि सदिग्ध असतें भूतकाळातल्या राजकीय दूरदर्शीपणाचा समावेश आपल्यात करून घऊन त्या सत्या त्याला कायमचा निमळ आकार प्राप्त करून देतात, आणि अशारितीनें पूर्वीच्या पिढ्याचा शहाणपणा, सयम आणि चारित्र्य भविष्य काळाच्या सुपूर्द करण्यास त्या सहाय्य करीत असतात

उदाहरणार्थ व्यक्तिश माझी तरी अशी श्रद्धा आहे कीं आम्हा कॅनडा मधील लोकानां, अन्य बहुतक लोकशाही राष्ट्राच्या तुलनेत, आमच्या राजेशाही मुळें अधिक लाभ घडतो राज्याची प्रमुख, परतु सत्ता न गाजवणारी राणी, आणि राज्याचा पत प्रधान आणि सत्ता गाजविणाऱ्या सरकारचा प्रमुख, या दोघांच्यामुळें लोकाना सरकारचा मर्यादाशीलपणा आणि विशिष्ट सरकाराच्या नेहमींच उदास नसू शकणाऱ्या हालचाली, याच्या मध्यें भेद पाडणें सोपें होतें कोणत्याहि मानवी प्रतीकाला शक्य होऊ शकलें नाहीं इतक्या मजले पर्यंत सपूर्ण जनतेची एकरूपता आणि तिचें भूत, वर्तमान आणि भविष्य याच्यामध्यें राहणारें सातत्य, याचे प्रतिनिधीत्व आणि नाट्यमयदर्शन राणी

शाहीनें होत असतें. राज्याची सेवा बजावताना, आपल्या हातून त्याक्षणींच्या व्यक्तिगत मतदारापेक्षा आणखी कशल्यातरी अधिग्रची सेवा घडत आहे, असें तिच्यामुळें वाटत असतें.

पुनरपि, माझें स्वत:चें असें मत आहे,—( अर्थात या बाबतीत माझी दृष्टि दूषित असेल ) कीं आमची पार्लमेंटरी पद्धति,—कायदेमंडळाला जबाबदार असलेल्या कायदेमंडळाचे सदस्य असलेल्यामधून माणसें निवडून प्रधान मंडळ बनविण्याची पद्धति,—अमेरिकन काँग्रेसनें अंगिकारलेल्या पद्धतीपेक्षा खरोखरच अधिक लाभदायक आहे कारण पार्लमेंटरी पद्धतीचें जबाबदार सरकार, म्हणजेच प्रधान मंडळ, त्याला वेळोवेळीं निवडणूकींच्या निर्मळ दिव्यामधून जावें लागतें, म्हणून तें कायदेमंडळाच्या अधिक जवळपास असतें. तसें सानिध्य निवडून न आलेल्या मध्याकडून सामान्यत कमी अधीं अपेक्षित असू शकतें.

त्याशिवाय, आमच्या पद्धतीत सरकारवर अविश्वासाचा ठराव मंजूर झाला, तर पार्लमेंटचें विसर्जन होऊन पुन्हा निवडणूक होते त्यामुळें पार्लमेंटचा व्यक्तिगत सदस्य, पक्षाच्या जूटीला अधिक चिकटून राहतो, आणि राष्ट्र हिताच्यासाठीं आलेल्या क्षणिक स्थानिक दडपणाला कमी अनुकूलता दर्शवितो आपल्या सदस्य सहकाऱ्यांच्या बहुमतावर कोणत्याहि वर्गी सरकार उलथून पाडण्याचें सामर्थ्य तो बाळगत असतो खरा, परंतु त्याचें मोल मात्र त्याला सार्वत्रिक निवडणूकींनी द्यावें लागत.

या दृष्टीनें कॅनडाच्या किंवा ब्रिटनच्या, ( अर्थात, हाऊस ऑफ् कॉमन्सच्या ) सदस्यांना अमेरिकन काँग्रेसच्या अथवा सिनेटच्या सदस्यांपेक्षा अधिक राजनीय अधिकार आहेत अमेरिकन सदस्यानां ठराविक कालमर्यादेच्या मध्यंतरी जर "कार्यकारी मंडळ" घालवायचें असेल, तर त्यांना आरोपपत्रक सादर करण्याचा मयकर निकराईचा मार्ग अवलंबिल्याशिवाय तसें करतां येणें अशक्य आहे याच्या उलट आमच्या पार्लमेंटरी पद्धतीत कायदेमंडळाच्या व्यक्तिगत सदस्यांना पक्षाच्या ऐक्याबद्दल निकोप आदर असतो, कारण पक्षांत दुबळेपणा आला तर नेहमीं निवडणूकीची संभवनीयता आणि त्याच्यामुळें त्याची स्वत:ची व्यक्तिगत व राजकीय अनिश्चीतता येत असते त्या मानानें कार्यकारी मंडळाला पुष्कळच सत्ता आहे;

कुणाला तर ती अतिरेकी देखील वाटेल परंतु माझ्या दृष्टीनें, त्यामुळें कायदे मंडळ विषयक आणि अमल बजावणी विषयक गंभीर दोषाचे विरुद्ध, परस्पर समतिदर्शक संरक्षक उपायाची तरतूद होत असते

आता महत्त्वाचा ग्रहण करण्यासारखा मुद्दा असा कीं, जागतिक राजकारणात लोकसत्ताच्यासाठीं काहीं ठरविक प्रभावाचा संच अस्तित्वात आहे, व त्यांचे स्वरूप बाह्य परिस्थितींनीं बदलत किंवा ठरत नसतें तसेंच त्याचा परराष्ट्रीय मुत्सद्देगिरीच्या मार्गाशीं किंवा घटनात्मक कार्यप्रणालीशी फार थोडा संबंध येत असतो यालाच मी आमच्या समाजाचें वातावरण, चारित्र्य, किंवा त्याचा नैतिक पाया, असें म्हणू शकेन, जागतिक राजकारणातलें आमचें भवितव्य सर्वस्वी आमच्यावर अवलंबून आहे, असें मानून घेणें मूर्खपणाचें ठरेल कारण आम्हीं काहीं एकटेच नाहीं आहोंत परंतु मला येथवें मात्र वादातीत दिसतें कीं, हें आमचें परराष्ट्रीय धोरण विषयक किंवा अन्य भवितव्य बऱ्याच मोठ्या प्रमाणात, इतर गोष्टींच्यापेक्षा आमच्या अतर्गत अनुकूलताच्या वर मुख्यत अवलंबून असतें जनता या नात्यानें आमची योग्यता, आमच्या विश्वासपात्र श्रद्धा आणि आम्हीं सर्वीदर्गे सरोखर ज्याचा पक्ष घेतो तीं मूल्यें, यांच्यावरच तें सारें नेहमीं अवलंबून राहील

मी जसजसा सरकारचीं धोरणें आणि कार्यपद्धती पाहू लागतो, तसतसें, मला अधिक विलक्षण वाटू लागतें गंभीर मनोवृत्तीच्या आणि बुद्धिमान व्यक्तींनीं आपण सगळे दैवाचे दास आणि नियतीचीं खेळणीं आहोंत अशी सूचना करणारा ऐतिहासिक कार्यकारण भावाचा सिद्धात कोणत्या ना कोणत्या स्वरुपात, मांडला किंवा मान्य केला तरी कशा ? मानवी बुद्धि केव्हा नैतिक संबंधापासून दुरावते, तेव्हाच असला दृष्टिकोण समजणें शक्य होतें

अर्थातच, या कार्यकारण भावाच्या सर्व सिद्धातांचें सार म्हणजे शरणागति ती संपूर्ण प्रश्न नुसता अधुक अस्पष्टच करीत नाहीं, तर त्याच्यावर एक काळा कुट्ट डाग मुद्दां पाडून ठेवतें कारण जीवन आणि इतिहास आणि राजकारण याना निःसदिग्ध महत्त्व मिळतें, तें व्यक्ती आणि राष्ट्रें यांच्या ठायीं नित्य जी शक्यता असते, तिच्यामुळेंच ! मात्र परिस्थितीना शरण जाण्याऐवजीं, त्याना सृजनात्मक कृतीनीं तोंड देण्यासाठीं ते तिचा नेहमींच उपयोग करीत नसतात अर्थात, काहीं प्रमाणात सगळींच माणसें भूतकाळातील परिस्थितींनीं निश्चित

केलेल्या कांहीं प्रवृत्ती भविष्यकालाकडे पोंहचल्या करतात, अगर यंत्रवत, बहुतकरून बाह्य प्रवृत्तींना अनुसरतात. परंतु माणसांनां यांच्या पेक्षां अधिक कांहींतरी करतां येणें शक्य असतें. त्यांनीं जर तसें केलें, तर ज्या परिस्थितींत तीं सांपडलेली असतात, तिचें रूप त्यांनां कांहीं अंशीं बदलतां येणें शक्य असतें. त्या परिस्थितीला साजेशी ( शिप्यानीं बनवलेल्या व आंगास येणाऱ्या पोशाखाप्रमाणें जणुं काय ) अनुरूप आणि तिच्यातूनच केवळ निर्माण न झालेली सृजनशील हालचाल त्यांना करतां येणें शक्य असतें.

माणसें किंवा राष्ट्रें यांच्या हातून घडणाऱ्या विधायक हालचालींच्या शक्यतेवर आमचा पूर्ण विश्वास आहे. अर्थातच, मनुष्य आणि त्याचें मन, हीं केवळ पिढीजाद किंवा परिस्थितिजन्य निर्मिती नव्हे. त्यांच्या आंगीं चैतन्याच्या निराकार विषयाशीं संबंध ठेवण्याची ही शक्यता असते, अशा अनुमानाच्या पायावरच तो विश्वास आधारलेला आहे. या कारणानेंच लोकमत आणि राजकीय निर्णय यांच्यावर, अन्य गोष्टींप्रमाणेंच जनतेची नैतिक दूरदृष्टि आणि मानसिक उंची यांच्या दर्जाचा देखील, आवश्यक परिणाम झाल्यावांचून राहत नाहीं. आंतर्राष्ट्रीय आणि अंतर्गत कारभाराच्या बाबतीत सुद्धां हें तितकेंच सत्य आहे. ( नैतिक विचारांना थारा न देतां, सरकारें नेहमीं आपल्या राष्ट्रीय हितांचाच पाठ पुरावा करीत असतात. ) असें मी वारंवार ऐकत आलों, आणि तुम्हीं देखील तसें म्हटल्याचें ऐकलेलें आहे, आणि विशेषतः परराष्ट्रीय धोरणांच्या बाबतींतच तसें म्हणण्यांत येत असतें, माझ्यामतें या निवाड्यानें अत्यंत लहान्या प्रश्नासाठींच हात पसरला. अर्थात, सरकारें त्यांना सुचतात, त्या राष्ट्रीय हिताचा पाठपुरावा करीत असतात. हें त्यांचें कर्तव्यच असतें. तथापि, वास्तविक पहिला प्रश्न असा कीं, सरकारांना ( किंवा लोकांना ) खरें राष्ट्रीय हित ,कोणतें,–तें वेगळें काढता येणें शक्य आहे काय ? आणि दुसरा प्रश्न असा कीं, त्यांनीं निश्चित केलेल्या उद्दिष्टांकडे जाण्याचा प्रयत्न करीत असतांना ते शहाणपणानें वागत असतात काय ? परंतु या बाबतीत राजकीय दूरदर्शीपणापेक्षांदेखील अधिक प्रमाणांत नैतिक दूरदर्शीपणाची गरज आहे. तुम्हांला तुमचें खरें हित कशांत आहे, आणि तें कसें प्राप्त करून घेतां येईल, यांचा निर्णय घेण्यासाठीं तो हवा असतो.

आंतर्राष्ट्रीय बाबतींत, किंवा अन्य देशांमधील हालचालींत, परिणामकारक

निर्णयाच्या बरोबर नैतिक विचाराच्या निर्णयात्मक संबंधाचा भर दण्यात यावा. अर्थातच, सर्वच राजकीय आणि परराष्ट्रीय प्रश्नाचा विचार, योग्य आणि अयोग्य, न्याय व अन्याय याच्या मधील द्वंद्वाचा प्रश्न म्हणूनच, फक्त करण्यात यावा असें मात्र मला सुचवायचें नाहीं नव्हे, तसें होऊ नयेच समस्याच्या कडे नैतिक मार्गानें झेंप घ्यायची, याचा अर्थ असा नव्हे कीं, केवळ आपल्या प्रामाणिक पणाला किंवा काळ्या गोऱ्यांच्या वर्णभेदाच्या भावनेला दिलेलीं साधीं आव्हानें, या दृष्टीनें आपण त्या समस्यांच्याकडे पाहावें

सत्य मान, खरोखर, याच्या विपरीत आहे त्यामुळें आपल्यात नम्रता आणि सहिष्णुता याची स्फूर्ति व्हायला पाहिजे या विषयावर काहीं चिंतनीय विचार प्राध्यापक ब्रेब्नेर यानी ३० ऑक्टोबर १९५४ मध्यें कोलंबिया विश्वविद्यालयाच्या द्विशत–सावत्सरिक दीक्षात भाषणाच्या प्रसगीं प्रगट केले होते —

' अलीकडील काहीं वर्षांत, जगाच्या पाठीवरील काहीं भागात हातीं राजकीय सत्ता असलेल्या माणसांनीं मूल्यें एकसाची राखण्याची सक्ति स्वतःवर लादून घेतली आहे, आणि सर्व इतर मूल्यें उखडून लावण्याची सक्ति स्वतःवर असल्याबद्दल आपल्या मनाची समजूत करून घेतलेली आहे त्या भागात नोकशाहीचें आणि छळ करण्याचें प्रचड वादळ घडका मारीत आहे. या वादळातल्या प्रत्येक व्यक्तीनें नित्यकाळ बिनचूक असलेंच पाहिजे, ही सर्व साधारण धारणा अत्यत भयप्रद आहे उचितच, ही वैचित्र्या सबधीची असहिष्णुता, म्हणजे रिकामा उद्दाम ढोल आणि स्वतःला हिंमत देणें असून, तें मूलभूत पणें आत्मघातकी पणाचें घातक आहे आमच्या काळीं हें पातक निसर्गावर किंवा मानवी स्वभावावर प्रभुत्व गाजविणाराच्या पूजनाचें स्वरूप धारण करील, किंवा एखाद्या व्यक्तीला, एखाद्या आर्थिक अस्तित्व असलेल्या वस्तूला, एखाद्या राजकीय पक्षाला, किंवा एखाद्या राष्ट्राच्या सत्तेला देवतेचे स्वरूप देईल ''

अत्यत धर्मस्वरूपाचा प्राचीन हिब्रूच्यासारखा पाखडी कर्मठपणा, आणि स्वतःच्या उच्च प्रामाणिकपणाविषयीं आत्मतुष्टीचें समाधान, या गोष्टी एखाद्या व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्याठायी असणें, नुसत्या अप्रियकरच नसतात, इतकेच नव्हे तर त्या शुद्ध राजकीय निर्णयाच्या सग्राहक देखील असत नाहींत. ज्या मनुष्याची नम्रता आणि नैतिक सवेदना याचा उच्च विकास किमान

झालेला असतो, त्याच्या हातून तत्वें आणि तपशील, किंवा वस्तुस्थिती, यांचा संबंध जोडण्याच्या प्रश्नाचा गोंधळ होण्याचा संभव असतो. तसेंच स्वतःच्या दृष्टिकोनाचीं सत्यासंबंधीच्या प्रश्नाशी सहज प्राप्त अप्रबुद्ध एकरूपता जुळवून देण्याची देखील शक्यता असते.

त्या शिवाय, आंतर्राष्ट्रीय गोष्टींच्या बाबतींत, आत्मन्याय्यताप्रामाणिकतेमुळें ताठर विचार आणि परमताविषयीं असहिष्णुवृत्ति निर्माण होत असते. त्यामुळें अनेक वेळा गुंतागुंतीच्या आणि बदलत्या परिस्थितींच्या संबंधांत, शहाणपणाची समजूत होण्यास प्रतिबंध होतो, आणि परराष्ट्रीय राजकारण बद्ध आणि ताठर करण्याकडे प्रवृत्ति होते

अगदी अलीकडे, शांततेकडे नेणाऱ्या खऱ्या प्रगतीला पोषक अशी जी सुधारणा घडली, तशी सुधारणा घडवून आणण्यासाठीं आमच्या जोमदार अविरत प्रयत्नाला शहाणपणाच्या समजुतीची जोड आपल्याला हवी आहे. आपली ध्येय दृष्टि न गमावता, आपण समंजस बनलें पाहिजे राष्ट्राध्यक्ष आयसेनावर यांनी हा मुद्दा थोडक्यांत चांगला मांडलेला आहे "आपण आपले पाय भूमीवर रोवावेत आणि डोकें नक्षत्रात खुपसावें," असे ते म्हणतात अर्थात असें करणें,-म्हणजे आपले पाय चिखलानीं बरबटून गेल्याशिवाय ते भूमिवर रोवणे, किंवा अंतराळात लक्ष्यशून्यतेने वाहवत गेल्यावाचून आपलें डोकें नक्षत्रात खुपसणें, इतकें काहीं सोपें नसतें.

खऱ्या शांततेकडे घाऊ शकणारी प्रत्येक शक्यप्राय पायरी शोधतांना आपण एक कार्यपद्धति अंगिकारलेली आहे, तिच्यामुळें आपलें प्रतिकारात्मक सामर्थ्य असलीं दुबळें न होऊ देण्याची, किंवा स्वतंत्रतेच्या मूल्याचा अजून मुख्य आवश्यक भाग असलेल्या, बाणेदारपणाचा कंटाळा न येऊ देण्याची, दक्षता आपल्याला अवश्य घ्यावी लागते' इस्टरच्या सणाच्या प्रसंगीं आपला शुभसंदेश देतांना पोप पायस १९५४ मध्यें म्हणाले -

" मारल्याला मस्त करणारा कंटाळा, हाच आजचा धोका "

अजूनसुद्धां दुबळ्या आणि बेसावध लोकांच्या प्रमाणेंच, कंटाळून गेलेल्यांना देखील हें जग सुरक्षित स्थान नाहीं

तरीसुद्धां ध्येयदृष्टिवांचून सामर्थ्य आणि शहाणपणा निष्फळ आणि पारितोषिकाला अपात्र ठरत असतो ध्येयदृष्टि हीच महत्वाच्या प्रत्येक

राजकीय आणि सामाजिक आंदोलनाची खरी प्रेरकशक्ति असते. आम्हांला वारसा मिळालेल्या संपन्न परंपरेत शिक्षण घेतलेल्या कोणत्याहि व्यक्तीला ही गोष्ट नित्यपरिपाठातली वाटण्याजोगी आहे.

गेल्या चाळीस वर्षांत कित्येक युरोपियन आणि आशियाई समाज हुकूमशाही दडपणामुळें विस्कळित आणि भग्न झालेले आहेत. अशा प्रकारें समाज मोडकळीस येऊन त्यांची शकलें पडतात, याचें स्पष्टीकरण आधींच एका प्राचीन हिब्रू पैगंबरानें देऊन टाकलेलें आहे,–"जेथें ध्येयदृष्टि नसेल तेथील लोक नाश पावत असतात." आपण हें सत्य मोठ्या तत्परतेनें एक नैतिक आग्रह म्हणून केवळ मनांत बाळगूं नये, तर राजकारण विषयक एक फडक आक्षेप म्हणून, त्याला मान्यता द्यावी.

हें जर खरें असेल, तर मग आपल्या सुधारणेला आज असलेला अत्यंत मोठा धोका बाहेरून नसून आंतूनच आहे. प्राध्यापक हॅले यानीं आपल्या अलीकडच्या "सुधारणा आणि परराष्ट्रीय धोरण" या पुस्तकांत हा मुद्दा चांगल्या तऱ्हेनें मांडलेला आहे. ते म्हणतात,—

"ज्या ध्येय दृष्टीवर आपल्या स्वतःच्या सुधारणेची पूर्ण मदार आहे, ही जर आपल्या सुधारणेच्या पूर्ण पणें कबजांत राहिली, तरच कम्युनिझमचीं आदर्श संबंधींची आव्हानें आकाशाला गवसणी घालण्याच्या यत्नांना ठरतील. सजीव वृक्षांना ज्या प्रमाणें वाळवी कांहींहि करूं शकत नाहीं, त्याच प्रमाणें कम्युनिझम आमच्यावर संकट आणूं शकणार नाहीं. आमच्या सुधारणेवर आज जें संकट येत आहे, तें बाहेरून नव्हे. तिची ध्येय दृष्टि दुबळी झाली म्हणून तें संकट आतूनच येत आहे."

माझ्यामतें, चालू शतकाच्या पहिल्या चार दशकात, पाश्चात्य समाजाची ध्येय दृष्टि दुबळी झाली होती, हें स्पष्ट आहे. आपल्या कालखंडाच्या इतिहासा संबंधी प्रामाणिक विचार करण्याचा, जर कुणी त्रास घेतला, तर त्याला दुबळ्या ध्येय दृष्टीनें झालेले परिणाम स्पष्ट दिसून येतील.

परंतु आमच्या सुधारणेची अत्यंत सखोल परंपरा म्हणजे सृजनात्मक प्रतिसाद आणि पुनर्निर्माण यांची निःसंदिग्ध क्षमता होय. अर्थात, या अणुयुगांत आपल्याला इतकी अस्थिरता परवडूं शकणार नाहीं. परंतु गेल्या

काहीं थोड्या वर्षांत लोकशाही समाजाच्या अंतर्गत एकंदर झालेली प्रगति योग्य दिशेनेच घडत आहे, असा भरवसा बाळगणें, माझ्या मतें सयुक्तिक ठरेल.

आपलें आजचें सावधपणानें आशावादी असणें जर समर्थनीय असेल, तर माझ्यामतें त्याचें एक कारण, आम्हाला ज्यांना सामना द्यावा लागतो, त्या आव्हानांचें प्रत्यक्ष प्रमाण आणि प्राविण्य हें होय.

कोणत्याहि चांगल्या इतिहासकाराला दर्शविता येईल असा, बाहेरील धोक्यापासून घडणारा लाभ, म्हणजे त्या धोक्याचा उपयोग तत्परतेनें विधायक प्रतिसाद देण्याच्या दृष्टीनें करता येतो त्याच्यामुळें कोणत्याहि परिस्थितीत वाखाणण्यासारखे प्रयास आणि पराक्रम आपल्या हातून घडतात परंतु हे बाहेरून दडपण आणण्यासाठीं धोके नसतें तर मात्र माणसें अधिक आळशी किंवा अधिक अदूरदर्शी बनले असते, आणि त्यांनीं या कार्याकडे उचितच दुर्लक्ष केलें, असतें अशीं दडपणें नंतर पुढच्या काळांत फायदे म्हणून मान्य करण्यात येतील त्याच्यामुळें निर्माण होणाऱ्या सवयींचें संवर्धन आणि सहकार्याच्या संस्था, हीं मात्र, त्यांना कारणी भूत झालेलीं आव्हानें नरमलीं किंवा नष्ट झालीं तरी, तशींच सुस्थिर राहून, पुढें दीर्घकाल मनुष्यांना त्यांच्या जीवन विकासाला सहाय्य देत राहतील

तेरा अमेरिकन वसाहतींचा १७६७ च्या कालमर्यादेतला संघ, हा ब्रिटनच्या दडपणाची प्रतिक्रिया म्हणून स्थापन झाला होता ही घटना अशा विधायक प्रतिसादाचें उदाहरण म्हणून देता येईल एका शतकानंतर कॅनडाच्या वसाहतींचें संयुक्तीकरण, हें अशा प्रकारचें दुसरें उदाहरण होय या संयुक्तीकरणाचें कारण काहीं तसें लहान सहान भयात नव्हतें आमच्या दक्षिणेकडील प्रबळ शेजाऱ्यांना त्यावेळीं "व्यक्त नियतीचीं" स्वप्नें, सबंध खंडाला गिळंकृत करण्याच्या दृष्टीनें, भव्य प्रमाणावर पडत असल्याचें आम्हाला दिसून आलें होतें

यासारखीं काहीं अलीकडचीं उदाहरणें सुद्धा उपयोगी ठरतील पश्चिम युरोप मधील लोकसत्तेच्या पुनर्रचनेच्या साठीं, १९४५ नंतर, उत्तर अमेरिकेचें आर्थिक सहाय्य कोणत्याहि परिस्थिती मध्यें वाखाणीय झालें असतें, परंतु सोव्हियत साम्राज्यवादानें पूर्व युरोपला धोका निर्माण केल्याशिवाय काहीं, तें सहाय्य उचित प्रमाणात पुढें करण्यात आलें नाहीं.

उत्तर ॲटलांटिक सहकार्याचा अन्य क्षेत्रात विकास झाल्यामुळे, त्यातूनच उद्भवणाऱ्या प्रश्नासंबंधी सल्लामसलती करण्याच्या सवयींची प्रगति झाली. पश्चिमेतील समाजात या सवयीमधून नुसत्या अर्थाने नवचैतन्य निर्माण करण्याचा स्पष्ट फल वेगळा काढता येतो या पिढीच्या संरक्षणाच्या योजनाची गरज संपल्यानंतर, मानवाना पुढच्या काळात त्याच गोष्टींच्यामधून निष्पन्न होणाऱ्या अन्याच गोष्टी उपयुक्त वाटू लागतील.

त्याचप्रमाणें मानवी सुधारणाच्यामधील भरपूर तांत्रिक आणि आर्थिक सहाय्यासकट सहकार्य आवश्यक वाटत असतें, आणि तें वाछनीय वाटत असतें तरी पण संकटाची जाणीव झाली, तरच तें तात्काळ आणि सहज सुलभ होऊं शकतें. आपण जर सध्याच्या तणातणी पुढें टिकाव धरू शकलों तर, माझ्या मतें, आता भयाच्या दृढपणामुळें स्थापन झालेले संबंध चिरकाल टिकू शकतील हीं बाह्य कारणें उद्या नष्ट झालीं, किंवा नरमली, तरी ते संबंध नंतर दीर्घकाल फलदायी आणि विधायक सिद्ध होतील अशी कल्पना करणें फारसें चुकीचें होणार नाहीं

तथापि, कोणत्याहि गोष्टीपेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे अंतर्गत प्रतिसाद होय मी मुद्दाम येथें याचा पुनरुच्चार करीत आहे, याचें कारण सुदृढ निकोप समाज मूलत स्वत्व प्रधान गोष्टींच्यावर अवलंबून असतो कोणत्याहि मानवी सुधारणेची मूलभूत लक्षणें तिच्या संस्था नसतात, तर जनता असतात. तीं लक्षणें म्हणजे लोकांच्या जाणीवा, त्यांच्या विचाराच्या तऱ्हा, आणि त्याना स्वत ला करावयाशा वाटणाऱ्या गोष्टी, हीं होत

जीवनानें मनुष्याच्या सन्मुख नेहमी दोन प्रश्न टाकलेले आहेत 'काय' करावें, आणि तें 'कसें' करावें। हा साध्य साधनांचा प्रश्न युगा इतका जुना आहे तो नेहमींच परस्परावलंबी असतो, म्हणून साध्याच्या निवडीपेक्षां जर साधनाना अग्रहक्क मिळाला, तर नेहमींच अनवस्था प्रसंग ओढवतील !

'कसें' हा प्रश्न अर्थातच तांत्रिक आहे आणि सर्वच तांत्रिक क्षेत्रात, ( समाजशास्त्रें वगळून, ) या प्रश्नाची यशस्वी उत्तरें गेल्या अर्ध शतकाच्या अवधीत पश्चिमेनें शोधून काढलेलीं आहेत वस्तुत नेहमी असें सुचविण्यात येतें, कीं आमच्या बहुतेक राजकीय आणि आर्थिक समस्यांवरलें औषध, आम्हाला निसर्ग शास्त्रात जो आग्रह, जें चैतन्य आणि जी कल्पकता

भरपूर मूल्यवान वाटली, त्यांचीच जोड समाजशास्त्रांना आम्हीं दिल्यास साधता येईल. सापडू शकेल.

यामुळें आपण मूल्याच्या क्षेत्रात प्रवेश करीत आहोत येथें मनीषाच्या पेक्षा मनावर कमी भर देण्यात येतो, साध्याच्या निवडीपेक्षा साधनाचें मूल्य कमी लेखण्यात येतें मी आधींच सांगून टाकल्याप्रमाणें, याबाबतीत कशाची गरज असेल, तर वास्तवतेच्या चाणाक्ष संवेदनेची आणि स्वेच्छ असलेल्या ध्येयदृष्टीची होय त्या दोघी सहप्रवास करू शकतात आणि त्यांनीं तसा तो केला सुद्धा पाहिजे. तोच खरा वास्तववादी, कीं ज्याला गोष्टी आहेत तशाच दिसतात, आणि त्या कशा होऊ शकतील, हें देखील जो बघू शकतो. प्रत्येक प्रसंगात प्रगतीची शक्यता वसत असते, प्रत्येक जीवनात काहींतरी अधिक चांगुलपणाची योग्यता दडलेली असते. खरा वास्तववाद द्विदर्शी असतो, त्याला वर्तमान दृष्टि आणि दूरदृष्टि या दोन्हीं असतात प्रसंगाची फक्त अर्धी बाजू पाहणारे, केवळ त्याचें प्रत्यक्ष स्वरूप किंवा शक्य भाव स्वरूप पाहणारे, हे कांहीं वास्तववादी असत नाहींत असें अर्धवट पाहणें, म्हणजे डोळ्याची निरर्थक उधळमाप होय या दोन दृष्टींच्यापैकीं दूरदृष्टि ही अधिक विरळा आणि अधिक महत्त्वाची असते परंतु पूर्णत्वासाठीं आणि परिणामकारकतेसाठीं आपल्याला दोन्हींची गरज असते

मानवाच्या सर्वच श्रेष्ठ धर्मांचें महत्त्वाचें मूलतत्त्व सांगते कीं, मूल्यांचें अस्तित्व वस्तुनिष्ठ असतें वस्तुतः तीं मूल्यें एका विश्वव्यापी आणि संपूर्ण वास्तवतेचीं रूपें असतात फक्त अंशतः हीं मूल्यें व्यक्तिगत मनुष्यांना समजू शकतात, फक्त अंशतः तीं कोणत्याहि विशिष्ट पदार्थमात्रात अनुस्यूत करता येतात, फक्त तात्पुरतीं तीं एखाद्या सांगितलेल्या नियमात किंवा कलाकृतींत व्यक्त होतात या गोष्टींची मान्यता आम्हाला सहिष्णुता आणि समजूतदार पणा यांची गरज शिकवीत असते, किंवा तिनें तशी ती शिकवायला पाहिजे होती

तथापि, जेव्हां न्हास आपलें कार्य करूं लागतो, तेव्हा सहिष्णुतेचे हे सगळे गुण उन्मळून, ते बेफिकीरीत संकोच पावतात एक मत, एक रुचि, एक प्रतिपाद हीं तिन्हींच दुसऱ्याच्या समान असतात, असा बेफिकीर दृष्टीतून, आणखी एक असा उपसिद्धान्त काढण्यात येतो कीं, तीं सगळीं सारखींच निरर्थक असतात परिणामीं आम्ही जें दुय्यम दर्जाचें व नकली असतें, त्यालाच उत्तेजन

विचार केल्यावाचून मान्यता देतो व गोते खात असतो त्याच्यामुळें दुराग्रह आणि असहिष्णुता याची भयकर आपत्ति आमच्यावर येण्याची शक्यता असते कारण त्यानें प्रगति आणि निरोगी विकास याच्या मूळावरच कुठाराघात केलेला असतो

तथापि, या व्याख्यान मालेचा समारोप निराश खिन्न स्वरात करण्याची माझी इच्छा नाहीं म्हणून मी जेथून सुरुवात केली, तेथेच म्हणजे इतिहासाकडें पुन्हा परत जात आहे आमच्या चिंता आणि आमचे आजचें असतोष याच्यावर अनुरूप मात्रा उगाळून देण्याचें कार्य इतिहास करीत आहे तो आमच्या निदर्शनास असें आणून देत आहे कीं, जरी आज शहाणपणा आणि निर्धार याची अत्यत मोठी आवश्यकता प्रतीत होत आहे, तरीसुद्धा आपल्याला पराभववादी किंवा निराश होण्याचें जरा देखील कारण नाहीं

मनुष्याला इतर मनुष्याच्या बरोबर शाततेनें राहण्याच्या कार्यात जें अपयश आलें, त्याच्या दु खद स्मृती आणि त्याचे उग्र परिणाम याना त्याला तोंड द्यावें लागत आहे त्यामुळें त्या प्रत्याच्या पकडीतून मोठ्या मिनतवारीनें तो कसातरी निसटू शकला, त्या प्रलयाच्या भविष्यकथनांची अपरिहार्यता त्याला अनेकदा मान्य करावी लागते भविष्यकालाबद्दल निराशावादी अनुमान, किंवा खरोखर कोणतेंहि अनुमान करणें हा नेहमींच धोकादायक बौद्धिक प्रयास असतो अठराव्या शतकात ब्रिटिश साम्राज्याच्या अत्यत महान माग्यक्षणाच्या उदयकाळीं, तें साम्राज्य तरणोपायापलीकडे बुडण्याच्या पथास लागलें, असें मानण्यांत येत होतें विल्यम विल्बर फोर्स १७९० मध्यें म्हणाला होता, " मला विवाह करण्याचें धैर्य होत नाहीं भवितव्य अत्यत काळेकुट्ट आणि अनिश्चीत आहे " वार्टर्लूच्या रणक्षेत्रावर नेपोलियनची नवी राज्यप्रणाली सूर्यास्ता बरोबरच धारातिर्थी अस्तगत झाली त्याच्यानतर पचवीस वर्षांनीं माजलेला गोंधळ आणि दगल याच्यामुळें, झारच्या मस्कोव्हिट टोळ्या सबंध युरोपला नमवितील, असें भविष्य करण्यापर्यंत काहीं लोकाची मजल गेली त्या टोळ्याच्यामुळें तेव्हा मनात उत्पन्न झालेल्या धास्तीचा प्रतिध्वनि आजच्या पश्चिम युरोपला ओळखीचा वाटेल परतु थोड्याच वर्षांत कोसॅक टोळ्या डान नदीपर्यंत मागे हटल्या आणि युरोपला आपला तरणोपाय शोधण्यासाठीं पुन्हां सधि मिळाली तीस वर्षांनंतर शातता आणि समाधान यानी काहीसा